


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








निव्वळ बुके वाचून मनुष्यास
शहाणपण येते असे नव्हे





संगणक महाजालानेही
शहाणपण येईल असे नाही



मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १७ : अंक २ उन्हाळा १९९९



अनुक्रमणिका

## अनुक्रम



---


☐ प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

☐ संपादन - समिती : विजया देव (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर, नीलिमा गुंडी

☐ संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : विजया देव, सुप्रिया, ६१/१४ एरंडवणे, पुणे ४११००४. दूरध्वनी : ३६८६९३

☐ व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४एरंडवणे, पुणे ४११००४. दूरध्वनी : ३३३८६९

☐ पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरणपृष्ठ तीन पहा.





☐ संपादक : विजया देव, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा

☐ मुद्रण स्थळ : सिध्दी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११०२९

# भाषेचे अभिसरण - एक आव्हान

जिवंतपणा टिकण्यासाठी शरीरात रक्त, हवा या गोष्टी जशा खेळत्या राहाव्या लागतात; तशीच भाषादेखील समाजात खेळती राहावी लागते. या संदर्भात मराठी भाषेपुढचे प्रश्न समजून घ्यायला पाहिजेत.

मराठी भाषेच्या अनेक प्रादेशिक आणि जातिनिगडीत अशा बोली आहेत. शिक्षणाच्या प्रसारामुळे आज अनेक प्रादेशिक गॅट, तसेच जातिसमूह यांना 'शब्द' या समर्थ माध्यमाची सनद प्राप्त होऊ लागली आहे. त्यामुळे अनेक बोलींमधूनही अलीकडे मोठ्या प्रमाणावर लेखन होऊ लागले आहे. गेली कित्येक वर्षे पाठ्यपुस्तकांमध्येही बोलीभाषेतील लेखन समाविष्ट होत आले आहे. प्रमाणभाषा आणि बोलीभाषा यांच्यातील नातेसंबंध निकोप, समंजस राहण्याच्या दृष्टीने ते आवश्यकही आहे.

मराठीला अनेक प्रकारच्या बोली असणे ही एका दृष्टीने मराठीची भाषिक श्रीमंतीच आहे. त्यामुळे तिच्यात वेगवेगळ्या भाषिक लकबी, वाक्प्रचार, विविध प्रकारची शब्दसंपदा यांचा अंतर्भाव होणे शक्य आहे. प्रत्यक्षात प्रमाण मराठीने बोलींमध्ये ग्रथित असलेली शब्दसंपत्ती किती डोळसपणे वापरली?- या प्रश्नाचे उत्तर फारसे समाधानकारक येत नाही. दलित, ग्रामीण साहित्यिकांच्या तीन पिढ्या झाल्या, परंतु दलित, ग्रामीण साहित्याचा एकही शब्दकोश आजमितीस सिद्ध झालेला नाही. (नुकताच राज्य मराठी विकास संस्थेने हा प्रकल्प हाती घेतला आहे.) तेव्हा प्रमाणभाषेचा मध्यवर्ती प्रवाह या विभिन्न बोलींना किती लवचिकपणे स्वत:त सामावून घेतो, याला महत्त्व आहे. प्रसारमाध्यमांच्या वाढत्या प्रसारामुळे भाषेचे अभिसरण वाढायला मदत होण्याची शक्यता वर्तविली जात आहे, ही बाब या संदर्भात जमेची बाजू ठरावी.

ज्ञानभाषा घडविण्याचा, तसेच रुळविण्याचा प्रश्नही याच्याशीच निगडीत आहे. जानेवारी १९९९ मध्ये हैद्राबाद येथे झालेल्या जागतिक मराठी परिषदेच्या पाचव्या अधिवेशनात अध्यक्ष या नात्याने बोलताना विख्यात शास्त्रज्ञ डॉ. रघुनाथ माशेलकर यांनी सांगितले की मराठीचे जतन आणि संवर्धन करावयाचे असेल तर तिचे ज्ञानभाषेत कायमस्वरूपी आणि गतिशील रूपांतर करण्यावाचून तरणोपाय नाही.

वास्तविक समाजात विविध स्तरांवर, विविध क्षेत्रांत लोकोपयोगी विद्या व्यवहारात टिकून असतात. तेव्हाच त्यांची अशी एक परिभाषाही रूढ असते. अगदी शेती, वस्त्रोद्योग अशा मोठ्या उद्योगांपासून कुटिरोद्योगापर्यंत सर्वच व्यवहारांसाठीची

भाषा काम करणाऱ्या मंडळींनी आपापल्या परीने जोपासलेली असते. ज्ञानभाषा तयार करताना ज्ञानाच्या साखळीतील हे सर्व दुवे जोडले जाणे आवश्यक आहे. नव्या शतकाच्या आरंभी नवे ज्ञानविषय निर्माणही होत आहेत. उदा. संगणक आणि त्याच्याशी संबंधित ज्ञानविश्व. या विषयीची मराठीतील परिभाषा आज स्वयंपूर्णरीत्या सिद्ध झालेली नसली तरी विविध दैनिके, नियतकालिके यांतून येणाऱ्या लेखनाद्वारे परिभाषा घडविणे चालू असल्याचे दिसते. ही परिभाषा मात्र पुस्तकी पातळीवरच राहते. प्रत्यक्षात उच्चारायला सुलभ असा 'संगणक' हा शब्दही आमच्याकडे व्यवहारात रूढ होत नाही. उलट त्याहून उच्चारायला कठीण असा 'कॉंप्यूटर' हा शब्द मात्र रूढ होतो! म्हणजे परंपरागत ज्ञानविषयांशी निगडित परिभाषा बोलीभाषेत व्यवहारात रूढ आहेत; त्यांना पुरेशा प्रमाणात लिखित भाषेत सामावून घेतलेले नाही; उलटपक्षी नव्या ज्ञानविषयांची परिभाषा ग्रांथिक पातळीवर सिद्ध होत आहे, तिला व्यवहारात स्थान मिळत नाही. या समस्येचे निराकरण करणे गरजेचे आहे.

बोली आणि प्रमाणभाषा यांच्या आंतरिक संबंधांबाबत आणखी एक लक्षात घ्यावयास हवे. मराठी भाषेला इंग्रजी आणि हिंदी भाषांकडून धोका असल्याचे आपण नेहमी ऐकतो. धोका जसा बाह्य आक्रमणापासून असतो, तसा अंतर्गत फुटीरतेमुळेही असतो. या बोलींना आपली नाळ मराठीशी जोडलेली आहे; असा विश्वास वाटणे आवश्यक आहे. जर प्रमाणभाषेचे मध्यवर्ती केंद्र फार संकुचित झाले, तर या बोलींना असा विश्वास वाटणार नाही. काही वर्षांपूर्वी मराठी लेखनाचे नियम शिथिल करून प्रमाणभाषेचा लवचिकपणा वाढविण्यासाठी एक पाऊल पुढे टाकले गेले असे म्हणता येईल. जागतिक मराठी परिषदेत डॉ. माशेलकरांनी, मराठी भाषेच्या रचनाबंधात आणि तिच्या उपयोगातही लवचिकता आणावी लागेल असेही प्रतिपादन केले आहे. त्या प्रतिपादनाचा गंभीरपणे विचार व्हायला पाहिजे. मराठीतील शब्द इंग्रजी शब्दकोशात स्थानापन्न होत असतात; हिंदी भाषेच्या वर्णमालेत 'ळ' हे अक्षर पाय रोवते (पाहा: 'सुलभ भारती', पाँचवी कक्षा हे पाठ्यपुस्तक) अशावेळी मराठीला काही बाबतीत प्रसरणशील बनण्यावाचून पर्याय दिसत नाही. भाषेची पायाभूत चौकट स्थिर राखून हे साधणे शक्य ठरावे.

तसेच मराठीला एक समर्थ ज्ञानभाषा अशा रूपात सामोरे आणताना तिच्यात लपलेल्या काही क्षमतांचा वापर करणे आवश्यक आहे. कायदा, विज्ञान इत्यादी विषयांतील संज्ञांना गणिती काटेकोरपणा व अचूकपणा आवश्यक असतो. अर्करूपाने ज्ञानग्रहण करण्यासाठी नवे सामासिक शब्द तयार करण्याची भाषेची क्षमता वाढवायला





अनुक्रमणिका

हवी. तसेच नवे सांकेतिक संक्षेप (जसे छंद शास्त्रात रूढ आहेत, त्या धर्तीवर) रूढ करायला हवेत. पायाभूत बैठक म्हणून समानार्थी, अभावार्थी, विरुद्धार्थी शब्दांचे कोश तयार करायला हवेत. उच्चारानुसार होणारे अर्थबदल लक्षात आणून देण्यासाठी ध्वनिफितींची निर्मिती करायला हवी. भाषेत घडणाऱ्या परिवर्तनाचा मागोवा घेऊन त्या परिवर्तनाचे परीक्षण व आवश्यकतेनुसार व्यवस्थापन करणारे व्याकरण ग्रंथ सतत लिहिले गेले पाहिजेत. शासकीय -निमशासकीय क्षेत्र, शिक्षणक्षेत्र यांतील मंडळींसाठी मराठीच्या प्रशिक्षणाची अद्ययावत् सोय उपलब्ध केली पाहिजे. एकंदरीत भाषेच्या अभिसरणाचा प्रश्न हे एक आव्हान आहे. सर्व समाजघटकांना एकत्र ओवणारे सूत्र म्हणून भाषेकडे पाहावयास हवे आणि त्यासाठी सर्वांनी एकत्र येऊन मराठीच्या विकासासाठीचा कृतिआराखडा सिद्ध करावयास हवा.

□□□

**नीलिमा गुंडी**

---

## राजाराणीच्या देशात

फादर फ्रान्सिस दिब्रिटो हे रोमन कॅथॉलिक पंथाचे धर्मगुरु. मराठी भाषा, संस्कृती याबद्दल दिब्रिटो यांना वाटणारा अभिमान त्यांच्या व्याख्यानांतून आणि ललित लेखनातून प्रकट होतो. त्यांचा अनुभव :

''ज्यांनी आपल्यावर दीडशे वर्षे राज्य केले त्या ब्रिटिशांच्या इंग्लंडला- सॉरी ग्रेट ब्रिटनला - चार महिने राहून आलो. इंग्लंड हा एक प्रांत किंवा राज्य आहे आणि संपूर्ण देशाचं नाव ग्रेट ब्रिटन आहे हे अनेकांच्या ध्यानात येत नाही. ग्रेट ब्रिटनमध्ये इंग्लंड, वेल्स व स्कॉटलंड ही तीन मुख्यं राज्य आहेत. प्रत्येक राज्याला कमालीची अस्तिमा आहे. आपण प्रथम इंग्लिश, वेल्स आणि स्कॉटिश असून नंतरच ब्रिटिश आहोत असं प्रत्येकजण मोठ्या अभिमानाने सांगतो. वेल्स लोकांना आपली वेल्स भाषा इतकी प्रिय की सार्वजनिक कार्यक्रमात पहिलं स्थान वेल्सला व नंतर इंग्रजी भाषेला. वेल्स माणसं एकमेकाशी इंग्रजीमधून नव्हे तर वेल्स मधूनच संभाषण करणं पसंत करतात. म्हणजे ग्रेट ब्रिटनमध्ये सर्व लोक इंग्रजी बोलतात हा समज पूर्णपणे चुकीचा आहे.

''इंग्रजी ही आंतरराष्ट्रीय भाषा आहे,'' असं विधान करून, मायबोलीला दुय्यम स्थान देणारे अनेक देशी साहेब आपल्याकडे आढळतात. त्यांनी आठवडाभर वेल्समध्ये वास्तव्य करून यावे. तिकडचे लोक आपली भाषा अभिमानाने बोलतात इतकंच नव्हे तिचा प्रचार आणि प्रसारही करतात. अनेक चर्चेजमध्ये वेल्स भाषेतून उपासना केली जाते.

मातृभाषा ही रक्तासारखी असते. शुद्ध रक्तामुळे शरीर निकोप राहते. दुसऱ्याच्या रक्तावर आपण जास्त काळ जिवंत राहू शकत नाही. मातृभाषेची हेळसांड करून, परभाषेचाच स्वीकार करणे म्हणजे अखंड डायलेसिसवर राहणे होय.

व्यवहारासाठी इंग्रजी गरजेची असली तरी जगण्यासाठी मातृभाषाच आवश्यक आहे, ही गोष्ट वेल्स माणसाकडून आपल्याला शिकता नाही का येणार ?''

□□□

# कन्नड -मराठी अनुबंध: काही उपपत्ती

श्रीरंग संगोराम

कन्नड-मराठी अनुबंधाकडे चालू दशकात अभ्यासकांचे विशेष लक्ष गेलेले दिसत आहे. परंतु या अनुबंधाचा विचार प्रचलित प्रमाणमराठीच्या दृष्टीने होणे आवश्यक आहे. प्राचीन व मध्ययुगीन मराठीवर कन्नड, तमिळ, तेलुगू या भाषांच्या आजवर झालेल्या अभ्यासातून प्रमाण मराठीचे स्पष्टीकरण कितपत मिळू शकले आहे हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे. प्रस्तुत लेखामध्ये संस्कृतोद्भव प्रमाण हिंदी व संस्कृतोद्भव प्रमाण मराठी यांना समोरासमोर ठेवून मराठीतील पृथगात्म भाषिक वैशिष्ट्यांकडे लक्ष वेधले आहे आणि या पृथकतेमागे कन्नडचा प्रभाव कसा दिसून येतो याचे सोदाहरण विवेचन केले आहे. मात्र हे सांगणे आवश्यक आहे की ही सर्व कार्यकारणमीमांसा शंकातीत व अंतिम स्वरूपाची आहे असा दावा सुतराम नाही. कन्नड-मराठीच्या अनुबंधावर नवा प्रकाश टाकण्याचा हा प्रयत्न आहे. त्याबद्दल विचक्षण अभ्यासकांच्या प्रतिक्रिया मिळतील व या विषयात आणखी काही भर पडेल अशी उमेद आहे.

अर्वाचीन प्रमाण मराठीचा विचार करता, या भाषेवर तमिळ, तेलुगू ,कन्नड व मल्याळम या द्राविडी भाषांपैकी कन्नडचाच प्रभाव सर्वांत अधिक झाला आहे आणि तो केवळ शब्दकेंद्रित नसून व्याकरण, उच्चारण व भाषाध्वनींच्यामधील परिवर्तनापर्यंत परिव्याप्त झालेला आहे. मराठी भाषा ही हिंदी, गुजराती, बंगाली, उडिया इत्यादी भाषांप्रमाणेच संस्कृतोद्भव अशी भारत-युरोपीय भाषा असली तरी द्राविडी व फारसी भाषांच्या प्रभावामुळे आपल्या याच कुळातील इतर भाषाभगिनींपेक्षा तिचे स्वरूप वेगळे झाले आहे. काही द्राविडी भाषाभ्यासक 'पंचद्राविड' भाषा अशी संकल्पना उभारून मराठीला उपरोक्त चार द्राविडी भाषांच्या बरोबर निबद्ध करतात. परंतु हेही तितकेसे बरोबर नाही. कारण अर्वाचीन प्रमाण मराठीवर एकनाथ काळापासून आणि बखर वाङ्मयातून फारसीचा परिणाम झाला आहे तसा द्राविडी भाषांवर झालेला नाही. म्हणून असे म्हणणे यथोचित ठरेल की मराठी ही पंचद्राविडीची कुटुंब-सदस्यही नाही आणि केवळ भारत-युरोपीय वंशवृक्षातील वारसाच पाठीशी असलेली संततीही नाही. मराठी ही खूप स्वागतशील राहिलेली आहे. तिने जेजे बाह्य प्रभाव घेतले आहेत. त्यांना आपल्या पचनसंस्थेत सामावून घेतले आहे. या संदर्भातले एक शेलके उदाहरण, फारसीच्या उदाहरणाने पाहण्याजोगे आहे. फारसी भाषेतील जिक्र या शब्दाचा मूळ अर्थउल्लेख (mention) स्मरण असा आहे. परंतु या शब्दाचे मराठीत फार सुंदरपणे अर्थांतर झाले आहे. संत तुकारामांनी ''जिकीर करो रे बाबा अल्ला की'' या हिंदुस्तानी भक्तिपदात प्रस्तुत शब्दाचा स्मरण हा मूळ अर्थ ठेवला असला तरी अर्वाचीन प्रमाण





अनुक्रमणिका

मराठीने 'जिकिरीचं काम' 'जिकिरीचा माणूस' 'फार जिकीर करू नको' असा भाषाध्वनी (स्वन आणि अर्थ या दोन्हीत बदल) घडवून मजा उडवून दिली आहे. अशी शेकडो उदाहरणे दाखवून देता येतील. तेव्हा अशा प्रकारचे सात्मीकरण ही मराठीची खासियत आहे आणि म्हणून मराठीला पंचद्राविडीची सदस्य मानण्यापेक्षा तिला 'पंचकल्याणी मराठी' म्हणणे अधिक सयुक्तिक ठरेल.

तिरुपतीचा व्यंकटेश हा महाराष्ट्र आणि द्राविड प्रदेश यांतील महत्त्वाचा दुवाच आहे. वैकुंठात विष्णूवर रुसलेली लक्ष्मी कोल्हापुरात येऊन वास करू लागली आणि तिच्या शोधार्थ विष्णू पृथ्वीवर आले व तिरुपती येथे वास करू लागले, अशी 'व्यंकटेश-माहात्म्या' तील कथा आहे. उत्तर कर्नाटकात (धारवाड, हुबळी, बेळगाव...) तिरुपती-व्यंकटेश हे अत्यंत महत्त्वाचे दैवत आहे. तिरुपतीची तीर्थयात्रा हे येथील मध्यमवर्गीय भाविकाचे एक स्वप्न असते. व्यंकटेश, व्यंकाण्णा, व्यंकोबा ही नामाभिधाने त्या भागात सार्वत्रिक आहेत. याच्या परिणामी मराठी प्रदेशातील पुरुष नामांतही हा व्यंकटेश रूढ झाला आहे. फरक मात्र हा की आपण मराठी स्वभावाप्रमाणे 'व्यंकटराव' असा दूरतेचा भाव ठेवून हाक मारतो, तर ते लोक प्रेमळ जवळिकीने 'व्यंकाण्णा' अशी हाक मारतील (आणि जाता-जाता) भाषाध्वनीच्या दृष्टीने हेही ध्यानी घ्यावे की मूळ नाम 'वेंकटेश' असे आहे. कानडीत 'ए' व 'ओ' यांचे ऱ्हस्व आणि दीर्घ असे दोन उच्चार आहेत. ऱ्हस्व 'वें' हा 'व्यं' सारखा ऐकू येतो. मराठीजवळ ऱ्हस्व 'ए'साठी लिपिचिन्ह नाही. त्यामुळे आपण 'व्यंकटेश' असे लेखन करतो. याचबरोबर 'विठ्ठलू' हा कानडा व कर्नाटकू आहेच. कन्नड दासभक्तांच्या पदांतूनही विठ्ठलाचे नाम अंकित झालेले आहे.

सुरुवातीस हे नमूद केलेच आहे की अर्वाचीन मराठी भाषेवर कन्नडचा प्रभाव कसा गडदपणे दिसून येतो, हा या लेखाचा विषय आहे. त्यामुळे ब्रिटिशपूर्व काळातील मराठीचा विचार येथे अभिप्रेत नाही. ब्रिटिश राजवटीत 'मुंबई प्रांत' हा एक मोठा भूभाग मानला गेला होता व त्यामुळे या प्रांतात उत्तर कर्नाटकातील प्रदेशही समाविष्ट होता. ज्या पुणे-मुंबईची मराठी प्रमाण म्हणून मान्य करण्यात आली त्या शहरांचा संपर्क सोलापूर, गुलबर्गा, विजापूर, बेळगाव, धारवाड, हुबळी या लहानमोठ्या शहरांशी जोडला गेला. त्यामुळे भाषिक अभिसरण विशेषत्वाने होत राहिले. सरकारी नोकऱ्यांतील बदल्या वगैरेंचाही दुरून परिणाम झाला. शिवाय कन्नड व मराठीभाषी अधिकाऱ्यांनी पारस्परिक भाषा शिकून घ्याव्यात असे सरकारी आदेश ही होते. या सर्व प्रदेशात कन्नड-मराठी समाज कमी-अधिक प्रमाणात एकत्र राहात आला व आजही राहात

आहे. उत्तर कर्नाटकाने मराठीला कितीतरी नामवंत साहित्यिक बहाल केले आहेत. अण्णासाहेब किर्लोस्करांपासून जी. ए. कुलकर्णी यांच्यापर्यंत नुसती नावे आठवून पाहावीत. आजमितीस उत्तर कर्नाटकात कानडी बरे बोलू शकणारे पण तिचे वाचन-लेखन करू न शकणारे असे मराठी भाषक पसरलेले आहेत. मुद्दा हा की रोटीबेटी व्यवहार, धार्मिक आदान-प्रदान, शेतीवाडी वगैरे कारणांमधून भाषिक अभिसरण होत राहिले आणि या कन्नड-मराठी भाषिक अभिसरणातून प्रमाण मराठीत भारत-युरोपिय भाषाभगिनींहून वेगळी अशी अनेक वैशिष्ट्ये प्रवेशली आहेत. भाषा-अभिसरणाची ही उपपत्ती कदाचित् काटेकोर संशोधनाच्या कसोटीवर उतरणार नाही, परंतु त्या संबंधात जे पुरावे आपल्या समोर आहेत त्यांच्या आधारे 'कार्य' सिद्ध होत आहे हे मात्र नि:संशय. कन्नडचा स्वनिक परिणाम कन्नडचा परिणाम मराठीतील स्वनव्यवस्थेवर (भाषाध्वनींवर) बऱ्याच प्रमाणात झालेला आहे. दूरत्वाने त्यास द्राविडी भाषांचा परिणाम असेही म्हणता येईल, परंतु भौगोलिक दृष्ट्या याचे श्रेय कानडीला द्यावे लागेल.

ट्, ठ्, ड्, ढ्, ण् हे मूर्धन्य ध्वनी द्राविडी भाषांतून मराठीत आले, असे अनेक विद्वानांचे मत आहे. याचा अर्थ नीट समजून घेतला पाहिजे. वास्तविक मूर्धन्य स्वन हे द्राविडी भाषेतून संस्कृतमध्ये आधी आले आणि प्राकृत व अपभ्रंशातून ते मराठीत आले. उदा. संकट, वसिष्ठ, बाणभट्ट, मंडल हे संस्कृत शब्दच आहेत. हिंदी भाषेतही मूर्धन्य स्वन आहेतच. हिंदीचा तर द्राविडी भाषांशी काहीच संपर्क नव्हता. मग द्राविडीतून मराठीत मूर्धन्य उच्चार आले याचा अर्थ काय समजावयाचा ? याचा अर्थ कन्नड, तेलुगू या भाषांच्यामुळे मराठीमध्ये मूर्धन्य उच्चारांचा वापर अधिक वाढला असा घेतला पाहिजे. याची काही उदाहरणे पाहू-

१) फारसी भाषेतून मराठीत आलेल्या काही शब्दांतील स्वनांचे मूर्धन्यीकरण झालेले आहे. उदा- फारसी मुर्दा चे मुडदा, परदा चे पडदा, मुर्दाफरोशचे मुडदेफरास, गर्द (= धूळ) यावरून वेगळ्या अर्थी गडद हा बनलेला शब्द. लद्दू (वाहून नेणारा) या हिंदी शब्दावरून 'लडदू' हा अर्थसाम्याने बनलेला लठ्ठ, आळशी या अर्थाचा मराठी शब्द. याचबरोबर मराठीच्या इतर शब्दप्रयोगांतही मूर्धन्याकडे कल दिसून येतो.

मराठीमध्ये 'ळ्' या स्वनाचे बाहुल्य आहे. तो कानडी भाषेचा परिणाम आहे. पुढील संस्कृत शब्दांची मराठी रूपे पाहा. बाल > बाळ, कदली > केळ, नील > नीळ, फलाहार > फराळ, काल > काळ, तिलक > टिळक; तसेच इंग्रजी हॉस्पिटल वरून इस्पितळ, rule वरून रूळ इत्यादी. आपल्याकडील कितीतरी नावे

ळकारयुक्त आहेत, उदा. कुळकर्णी, डेंगळे, पाटोळे, वाळके, बल्लाळ, वेल्हाळ इत्यादी. समर्थ रामदासांच्या काव्यात तर ण आणि ळ यांचा वापर सर्वाधिक झालेला आढळतो. उदा. ''सत्राणे उड्डाणे, हुंकार वदनी करि डळमळ भूमंडळ सिंधू जळगगनी,'' किंवा ''अचपळ मन माझे नावरे आवरीता'' या उदाहरणात ळ ऐवजी ल वापरल्यास मराठीच्या व्यक्तिमत्त्वाला बाध येईल. शिवाय अर्थहानीही होईल. कारण 'अचपळ' ऐवजी 'अचपल' म्हटल्यास 'चपल नसलेला' असा अर्थ होईल. (समर्थांनी अतिचपल या उपसर्गयुक्त शब्दातील 'ति' चा लोप करून आणि ल चा ळ करून हा शब्द घडविला आहे. अशाच प्रकारे कळवळा, बुळबुळीत, खळाळणे असे कितीतरी देशी शब्द मराठीत मिळतील. ''घननीळा लडिवाळा हलवू नको हिंदोळा'' ही भावगीताची ओळ 'ळ' च्या मुळे म्यूझिकल बनली आहे. येथे ल चा वापर केला तर मराठी हरवेल. कन्नडमध्ये ळ ह्या व्यंजनाची अगदी रेलचेल आहे. उदा- बळ्ळोळ्ळी (कांदा), झळझळा (चकचकीत), केळगे (खाली, below) वोळगे (आत), बहळ (खूप), हे ऽ ळु (सांग) कोळ्ळाचा (चोर)-असा हा 'ळ' सुळसुळाट आहे. त्यामुळे हा 'ळ' कानडीच्या संपर्कातून मराठीत पसरला असला पाहिजे. या अनुमानाला पुष्टी देणारे आणखी एक कारण असे की प्राकृतात 'ळ' हे व्यंजन अनुपस्थित आहे. हिंदीमध्ये तर ते नाहीच आहे.

मराठीमध्ये तालव्य वर्ण-च्, छ्, ज्, झ् यांच्या उच्चारात दोन प्रकार आहेत. च्, ज्, आणि झ् हे काही शब्दांत तालव्य (चंचल , जम्मत, झेंडा) आहेत आणि काहीत दंतमूलीय देखील (चालू, जवळ, झबले) आहेत. संस्कृतमध्ये हे स्वन फक्त तालव्यच आहेत. हिंदीतही तसेच आहे. हिंदीमध्ये फक्त अरबी, फारसी शब्दात दंतमूलीय ज् येतो. त्यामुळे हे स्वन इतर भाषांतूनच मराठीत आले आहेत, याला पुष्टी मिळते. यातील ज हा दंतमूलीय उच्चार फारसीकडून आला आणि मराठीतील तद्‌भव शब्दांतही तो रूजू झाला. परंतु च हा (चावट मधील) उच्चार फारसीतून आलेला नाही. तो कानडी व तेलगू भाषेतून मराठीत आला असला पाहिजे. या दोन्ही भाषांत 'च' व 'ज' हेच दंतमूलीय उच्चार आढळतात. उदा - कन्नड हुच्च(=वेडा) जोऽके माडु (=पालन कर). शुद्ध कन्नडमध्ये हे उच्चार नसले तरी उत्तर कर्नाटकातील व्यावहारिक भाषेत हे विद्‌यमान आहेत. काही कन्नड बोलीत तर ते आहेतच, तेलुगूमध्येही ते आहेत. त्यावरून ते मराठीत आले असले पाहिजेत (झूल ब्लोक). शिवाय मराठीत फारसी व्यतिरिक्तच्या शब्दांमध्ये सुद्‌धा दंतमूलीय ज आहे. उदा-जवळ, जाणे, जांभूळ, जास्वंद इत्यादी.

'ज' चा दंतमूलीय उच्चार (उदा. जवळ) मराठीत कुठून आला याचाही विचार झाला पाहिजे. कारण हा उच्चार संस्कृतातील नाही. परंतु मजदूर, जरदा, बाजार, मिजगाँ (पापण्या), नाज (नखरा) यांसारख्या फारसी शब्दात दंतमूलीय ज आहे. मराठीने तेलुगूमधील दंतमूलीय च्,ज् तसेच फारसीमधील दंतमूलीय ज्, झ् चा उपयोग संस्कृतोत्पन्न तद्भव शब्दांच्या उच्चारातही करून घेतला असावा, असे अनुमान काढता येईल. उदा- संस्कृत अद्य वरून आज हा शब्द मराठी व हिंदी दोन्ही भाषांत आला. परंतु हिंदीत आजच्या उच्चारात तालव्य 'ज' च आहे. मराठीत मात्र तो दंतमूलीय झाला. तसेच झटिति या संस्कृत शब्दावरून 'झट-से' हा हिंदी शब्द व 'झटकन' हा मराठी शब्द आला. हिंदीमधील झ संस्कृतप्रमाणे तालव्यच राहिला परंतु मराठीत मात्र तो दंतमूलीय झाला. या सर्व उच्चार-वैशिष्ट्यांची कारणपरंपरा आपल्याला कन्नड-तेलुगू व फारसी या भाषांच्या तालव्य स्वनवैशिष्ट्यात सापडू शकेल असे अनुमानतः म्हणता येईल. डॉ. ना. गो. कालेलकर यांनी मराठी विश्वकोशासाठी 'तेलुगू 'भाषेवर लिहिलेल्या टिपणामध्ये दंतमूलीय च व ज मराठीमध्ये तेलुगूमधून आले असावेत असे अनुमान व्यक्त केले आहे. परंतु भौगोलिक दृष्टीने पाहता तो कन्नडचा परिणाम आहे असे मानावे लागेल. तसेच प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनीही ''दंत-तालव्य दंतमूलीय उच्चारही, मराठीत कदाचित द्राविडीतून आले असावेत'' असे विधान केलेले आहे. (कुलकर्णी कृ.पां.)

मराठी भाषेमध्ये 'ण्' चे प्रमाणही अधिक आहे. हिंदीशी तुलना केल्यास हे लक्षात येते. उदा- [ कंसात हिंदी शब्द ] कोण (कौन), जाण (जान), वजनाचा मण (मन), करणे (करना), जाणे (जाना) इत्यादी. याचे कारणही आपल्याला कन्नडच्या परिणामात शोधता येईल. माडोणु (करू या), होगोणु (जाऊ या), सुण्ण(चुना), अण्णा (मोठा भाऊ), बसवण्ण (बसवदेव), बण्ण (रंग), एण्णे (तेल), हेण्ण (कन्या), हण्णु (फळ), कण्णु (डोळे) या शब्दांवरून कन्नडचा 'ण' कडील कल दिसून येतो. मराठीमध्ये ठणाणा करणे, ठणठणपाळ, ठाण मांडणे, ठिकाण, कणकण, फणफण, कुणकुण, सणकणे, ठणकणे असा 'टणत्कार' आपल्या परिचयाचा आहे. हा कन्नडचा प्रभाव असला पाहिजे असे म्हणण्यास भरपूर वाव आहे. परंतु एक शंका अशी येईल की प्राकृतामध्ये पर्ण > पण्ण, शून्य > सुण्ण अशी रूपे आहेत/ होतात. तेव्हा 'ण' ची अधिकता तेथून आली नसेल कशावरून? याला उत्तर असे की त्याची प्राकृत मराठीत क्रमशः पान व सुने अशीच रूपे झाली आहेत. म्हणजे संस्कृत परंपरेत मराठीने 'न' चाच स्वीकार केला. त्यामुळे मराठीतील 'ण' च्या या आधिक्यास

कन्नड भाषा कारणीभूत ठरते.

द्राविडी वर्णमालेमध्ये ए व ओ ची दोन दोन रूपे आहेत. ऱ्हस्व ए व दीर्घ ए आणि ऱ्हस्व ओ व दीर्घ ओ. ऱ्हस्व ए हा 'य' कडे झुकतो आणि ऱ्हस्व ओ हा 'य' व 'ह' कडे झुकतो. या श्रुतीचा काहीसा परिणाम सर्वसामान्य स्तरावरील मराठी भाषकांच्या उच्चारावर झालेला आढळतो. उदा-'एक'चा उच्चार 'यक' कडे झुकतो. ''यकदा नाही दोनदा सांगतो'' असे बोललेले आपण ऐकतो. एस्.टी. चे यष्टी असे उच्चारण ऐकू येते. परंतु हा परिणाम सांगली कोल्हापूर कडील मौखिक मराठीवर जास्त प्रमाणात दिसून येतो. संस्कृतच्या बडग्यामुळे आजच्याप्रमाण मराठी उच्चारावर त्याचा प्रभाव कमी आहे. तथापि ग्रामीण मराठीमध्ये 'होय' च्या ऐवजी व्हय किंवा 'वेळेला' च्या ऐवजी यळंऽला, 'माझ्या व्हटाचं डाळिंब फुटलं', 'ओंगळ ऐवजी बंगाळ' असे जे प्रयोग आढळतात त्यामागे कन्नडतील ऱ्हस्व ए व ऱ्हस्व ओ असले पाहिजेत. असे नसते तर, मिरज, सांगली, कोल्हापूर कडील कन्नडमधील मौखिक भाषाव्यवहारात त्यो, त्ये, व्हय वगैरे उच्चार रूढ झाले नसते.

**द्राविडीतील ऋणशब्द**

द्राविडी भाषांमधून कन्नडद्वारे मराठीत आलेले शब्द संख्येने फार नसले तरी ते मराठीतील नित्य व्यवहारातले अटळ असे शब्द बनून मराठीत एकजीव झालेले आहेत. यासंबंधी श्री. शं.बा. जोशी, डॉ.ग.ह.खरे यांनी नोंदी केलेल्या आहेत. काही शब्दांची उदाहरणे अशी आहेत :- (मराठी शब्दापुढे कंसात कानडी शब्द-) :- अक्का (अक्क),अम्मा (अम्म), अप्पा (अप्प), अण्णा (अण्ण), चोळणा (चळणा), कडबू (कडब), उसळ (उसळे), कोशिंबीर (कोसंब्रे), तूप (तुप्पु), पोट (होट्टे) पुरण (हूर्ण), पोळी (होळिगे), आजोबा-मूळ शब्द आजा (अज्जा) (ज दंतमूलीय); गोंधळ (ग्वंदला), बोंबलणे (बोंब्वाट) इत्यादी. अडकित्ता या शब्दाचे मूळ कानडीत आहे. 'अडके' या कानडी शब्दाचा अर्थ सुपारी आणि क्वई म्हणजे आज्ञार्थी क्रिया काप. अडके+क्वइता म्हणजे सुपारी कापणारा; त्यावरून कानडीत अडकोत्तु आणि त्यावरून मराठीत अडकित्ता. 'आटु' (=खेळ) या कन्नड शब्दावरून गों गों + आटु = गोंगाट असा शब्द झाला असावा असे डॉ. ग. ह. खरे यांचे अनुमान आहे. उंडी (= लाडू) या शब्दावरून 'छोटे उंडे करा' असे प्रयोग मराठीत आले. ''दहिभाताची उंडी ...'' हे ज्ञानदेवांच्या अभंगातील उदाहरण सर्वश्रुत आहेच.

शिकेकाई याचा मूळ कानडी शब्द **'शिगेकाई'** हा आहे. काई या कानडी शब्दाचा अर्थ शेंग. **सीगे** नावाच्या झाडाची शेंग म्हणजे सिगेकाई. पुढे शिगेकाई

> शिंकेकाई अशा प्रकारे हा शब्द मराठीत आला. 'बडिसु' या कन्नड धातूचा अर्थ जेवायला वाढणे असा आहे. त्यावरून वाढणे हा मराठी शब्द आला. 'गुंड' (=गोल) यावरून गुंडी (=बटण), गुंड (=गोल पातेले) हे शब्द आले. रुबणे हे क्रियापद कन्नडमधून रुजू झाले. 'तुम्ब' (=तुडुंब) वरून तुंबणे हा शब्द आला. त्याचप्रमाणे 'बडि' (=मारणे) वरून बडिवणे, ओदरु(=हाक मारणे, मोठ्याने बोलावणे) वरून ओरडणे, हेदर, ह्यदर (भिणे) वरून भेदरणे आणि मेरे (दोन्ही ए ऱ्हस्व) (= उठून दिसणे) व मेरेसु (=प्रदर्शन करणे) वरून मिरवणे अशी नादप्रतिमायुक्त चपखल क्रियापदे मराठीत आली. तसेच 'इत्तकडे' वरून इकडे, आत्तकडे वरून तिकडे आणि 'संगड' वरून सगट ('सिंधूसगट संसाराला...' 'एकच प्याला' नाटक) अशी अव्ययेही मराठीने कन्नडवरून घेतली.

कन्नडमार्गाने मराठीत आलेल्या वरील शब्दांचे मूळ भारत-युरोपीय भाषांत नाही. कारण हिंदी भाषेत वरील शब्द मिळणार नाहीत. या शब्दांचे निरीक्षण केल्यास पुढील गोष्टी लक्षात येतात- (१) वरील शब्दातील अक्का, अण्णा, आजा, अप्पा हे नातेवाचक शब्द; पोळी, कोशिंबीर, तूप हे अन्नविषयक शब्द; बडिवणे, (भोजन) वाढणे, ओरडणे, बोंबलणे हे क्रियावाचक शब्द आणि इकडे-तिकडे हे अव्ययशब्द हे संख्येने कमी असले तरी प्रमाण मराठीच्या मौखिक व लिखित व्यवहारातील 'उठता-बसता' व्यवहारातील शब्द आहेत. (२) 'गुंड', 'उंडे' मधील अर्थ परिवर्तनाची प्रक्रिया ही मराठीच्या भाषिक जिवंतपणाची खूण आहे. (३) अप्पा, पोट यांची व्युत्पत्ती संस्कृतच्या आप्त, पेट (=पिशवी) या शब्दांवरूनही सांगता येते. यातील पेट हा शब्द हिंदीत रूढ असल्यामुळे 'पोट' च्या या व्युत्पत्तीला पुष्टी मिळते; परंतु 'अप्पा' हा शब्द कानडी-मराठी प्रदेशातच बहुरूढ असल्यामुळे कानडीवरून त्याचे आदान झाले असणार.

**कन्नडचा व्याकरणिक परिणाम**

मराठीवरील द्रविड भाषांच्या परिणामाबाबत आतापर्यंत जो अभ्यास मांडण्यात आला आहे तो मुख्यतः शब्द-आदानातच अडकून पडला आहे. आणि तोही आदिकालीन मराठीच्या संदर्भातच विशेषत्वाने झालेला आहे. वस्तुतः व्याकरणिक दृष्टीने कन्नडचा प्रमाण मराठीवर लक्षणीय असा परिणाम झालेला आहे. परंतु कन्नड मराठी अभ्यासकांचे त्याकडे लक्ष गेलेले दिसत नाही. हा परिणाम अव्ययांच्या आदानातून झालेला आहे. आणि यायोगे मराठीला अभिव्यक्तीची वेगळी धाटणी प्राप्त झाली आहे. या वैशिष्ट्याचे प्रत्यंतर हिंदीशी तुलना करताना अधिक स्पष्टपणे मिळते.

या संबंधीच्या काही उपपत्ती खालीलप्रमाणे आहेत-

**(अ) होय-होत उपपत्ती** - (१) परमेश्वर हाच सत्य **होय**. (२) विकारांना विरोध म्हणजे ब्रह्मचर्य **होय**. (३) कुत्रा, मांजर हे माणसाने पाळलेले प्राणी **होत**. (४) गांधी हे थोर सत्यवादी **होत**. या वाक्यांतील **होय** व **होत** यांच्या व्याकरणिक रूपांची संगती मराठीवरून लागू शकत नाही. मराठीच्या रूपिम रचनेनुसार 'हो' या धातूवरून त्यांची रूपे बनली हे उघड आहे. परंतु त्यांची प्रत्ययप्रक्रिया कोणती हे ध्यानात येत नाही. इंग्रजीतील 'yes' या अर्थाने येथे 'होय' चा वापर झालेला नसून 'आहे हे असे आहे' असा अवधारणात्मक अर्थ त्यातून सूचित होत आहे. 'परमेश्वर हाच सत्य होय' याचे हिंदीमध्ये 'परमेश्वर ही सत्य हाँ (येस्)।' असे करून चालणार नाही. मराठीमधील अशा 'होय'ची ही आर्थिक लकब हिंदीजवळ नाही. 'होय'चा वरील विशिष्ट अर्थ 'आहे' याच्या पलीकडे जाऊन अबाधित सत्याचे सूचन करीत आहे. हीच गोष्ट वरील क्र.३ व ४ मधील वाक्यांतील 'होत'च्या बाबतीतही आहे.

वरील विशिष्ट रूपप्रक्रियेचे निदान कन्नडवरून होण्यासारखे आहे. कन्नडतील अहुदु (बोलताना हौदु) या अव्ययाचे होय/ होत हे भाषांतरित आदान असावे असे वाटते. 'अहुदु' हे अव्यय कन्नडमध्ये क्रियापदाचे प्रकार्य करते. वरील चार वाक्यांची कन्नड रूपे अशी असतील- (१) परमेश्वरवे सत्य अहुदु (२) विकारक्के विरोध एंदरे (म्हणजे)ब्रह्मचर्य अहुदु (३) नाइ, बेक्कु इवु मनुष्यनु (माणसाने) साकिद (पाळलेले) प्राणिगळु अहुदु (४) गांधियावरु दोड्डु सत्यवादी अहुदु. हे 'अहुदु' अव्यय सर्वपुरुषी, सर्वलिंगी, उभयवचनी सारखेच चालणार, कारण ते क्रियापद नव्हे. असाच प्रयोग मराठीनेही घेतला. उदा. गंगा ही पवित्र नदी होय. हिमालय हा जगातील सर्वांत उंच पर्वत होय. परंतु मराठीच्या जिवंतपणाचे कौतुकास्पद **वैशिष्ट्य** हे की तिने 'होय' चे 'होत' असे अनेकवचनी रूप करून या भाषांतरित कन्नड अव्ययावर मराठी व्याकरणाचा वेष चढविला आहे.

**(आ) म्हणजे, म्हणून, म्हणे उपपत्ती** - (१) तू गेलास **म्हणजे** मी येईन. (२) त्यांनी असे केले **म्हणे**. (३) मी एक संगीत रसिक **म्हणून** या कार्यक्रमाला आलो आहे. (४) तो येतो **म्हणून** म्हणाला. या उदाहरणांतील 'म्हणजे' हे अव्यय 'it means that ' या अर्थी आलेले नाही. याचे हिंदी भाषांतर 'तुम जाओ याने मैं आता हूँ' असे न होता तेथे 'फिर' हे अव्यय वापरावे लागेल, तरीही त्यातून या

'म्हणंजे' ची अर्थछटा संज्ञापित होणार नाही. अशाच प्रकारे म्हणे, म्हणून या अव्ययांचेही प्रकार्यलक्ष्यी स्पष्टीकरण मराठी भाषा व व्याकरण यांच्या आधारे देता येईल, असे वाटत नाही. वाक्य क्र. २ मधील 'म्हणे' हा मोरोपंती वचनातील 'कृष्ण म्हणे रे पार्था' मधील 'म्हणे' पेक्षा वेगळा आहे. याचे हिंदी भाषांतर ''(ऐसा) सुनते हैं कि उन्होंने ऐसा किया।'' असे करावे लागेल. हेच स्पष्टीकरण 'म्हणून' च्या बाबतीत आहे. डॉ. ग. ह. खरे यांनीही याकडे लक्ष वेधले आहे, (खरे ग.ह.). क्र. ३ च्या वाक्यातील **म्हणून** याचे हिंदी भाषांतर 'इसलिए' या शब्दाने होणार नाही. त्याकरिता 'उसनें कहा कि मैं आऊँगा,' असे भाषांतर करावे लागेल. क्र. ४ च्या वाक्यातील म्हणून याचा अर्थ 'असे' हा आहे; 'therefore' असा नाही हे वेगळे सांगण्याची गरज नाही. मराठीत नित्य वापरात असलेल्या या अव्ययांचे भाषिक स्पष्टीकरण कन्नडमधील अव्ययांच्या भाषांतरित आदानाच्या आधारे देता येईल. वरील वाक्यांची कन्नड रूपे पाहावीत - (१) नीनु (तू) होदे (गेलास) अंदरे (म्हणजे) ना (मी) बरूत्तेने (येईन या अर्थी) (२) अवरु (ते) हीगे (असे) माडिदरु (केले) अंते (म्हणे). (३) नानु (मी) ओब्ब (एक) संगीत रसिक अंत (म्हणून) ई कार्यक्रमक्के बंदिद्देने (आलो आहे). (४) अवनु (तो) बरुत्तेने (येतो) अंत (म्हणून) अंदा (म्हणाला).

कन्नडत अंत (म्हणून) आणि अंते (म्हणे) अशी दोन अव्यये आहेत 'अंत' चे क्रमशः इसलिए किंवा 'या नात्याने' आणि 'असे' अशा प्रकारचे दोन अर्थ आहेत. मराठीने वरील क्र.३ च्या मराठी वाक्यात पहिला व क्र. ४ च्या वाक्यात दुसरा अर्थ स्वीकारून आपल्या अभिव्यक्तीत लाघव आणले आहे. 'म्हणे' या अव्ययाचा 'अस. ऐकतो की किंवा ऐकिवात आहे की' या अर्थी उपयोग मराठीने 'अंते' (म्हणे) या कानडी अव्ययावरून घेतला असणे शक्य आहे. डॉ. ग. ह. खरे यांनीही याकडे लक्ष वेधले आहे, (खरे ग. ह.)

**पुरे, पाहिजे उपपत्ती-** (१) एवढे केले की **पुरे.** (२) संयुक्त महाराष्ट्र झालाच **पाहिजे.** या वाक्यांतील 'पुरे' व 'पाहिजे' ही अव्यये क्रियापदाचे काम करीत आहेत. 'पुरे' नंतर आहे किंवा होईल या क्रियारूपांची गरज पडलेली नाही. हिंदी मध्ये 'पुरे' या अर्थी येणाऱ्या 'बस'. या अव्ययाबरोबर एखादा संदर्भ वगळता 'है' किंवा 'हो गया' ही क्रियारूपे जोडावी लागतात. मराठीत 'पुरे' चा असा वाक्यपूर्णार्थक प्रयोग कन्नडमधील 'साऽकु' या अव्ययात मिळतो. उदा. इष्टु (एवढे) माडिदरे (केले

की) साऽकु (पुरे). म्हणून मराठीतील वरील प्रकारचा 'पुरे' हे 'साऽकु' चे भाषांतरित अनुसरण असावे असे म्हणण्यास जागा आहे. वरील क्र.२ च्या वाक्यात 'पाहिजे' चा उपयोग 'चाहिए' प्रमाणे झालेला आहे. 'परंतु तेथे भगवंताचे अधिष्ठान पाहिजे' या समर्थवचनातील 'पाहिजे' याचा अर्थ पाहा, perceive असा आहे. 'चाहिए' असा नाही. हे कन्नडमधील 'बेऽकु' या अव्ययाचे भाषांतरित आदान असावे असे वाटते. ''संयुक्त महाराष्ट्र आगलिक्के (झाला) बेऽकु (पाहिजे).'' यात 'बेऽकु' चा असा उपयोग झालेला आहे.

**संदर्भ :**


(१) ना. गो. कालेलकर : 'तेलुगू' : मराठी विश्वकोश खंड ७

(२) कृ.पां. कुलकर्णी महाराष्ट्र साहित्य पत्रिका; जानेवारी १९४४

(३) ग. ह. खरे: निवडक लेख भाग २; प्रका. ग.ह. खरे (१९७६)

(४) शं. बा. जोशी: मऱ्हाटी संस्कृती काही समस्या: व्हीनस प्रकाशन, द्वि.आ. १९८०.

(५) झूल ब्लोक: मराठी भाषेचा विकास : अनुवादक व प्रका. वा. गो. परांजपे (१९४१).


□□□


**''रामनाथ'' ५१, गणेश मळा,**

**सिंहगड मार्ग, पुणे- ४११०३०**

**दूरध्वनी : ४३३४५७२**







अनुक्रमणिका

# विविध स्तरांवरील भिन्न मराठी

कल्याण काळे

*(जाने. ११ ते १३ १९९९ दरम्यान, मराठी विभाग-पुणे विद्यापीठआयोजित चर्चासत्रात वाचला गेलेला निबंध)*

कोणत्याही भाषिकसमूहाची भाषा कधीही एकरूप नसते. समाजातील निरनिराळ्या भेदांनुसार ती भिन्न भिन्न रूपे धारण करते. व्याकरणाच्या पुस्तकांतून शिकवली जाणारी भाषा आणि भिन्न भिन्न स्वरूपांत आविष्कृत होत जाणारी समाजभाषा यांमध्ये त्यामुळे खूपच फरक पडतो. पारंपरिक पद्धतीची व्याकरणे परभाषांच्या साच्यात बसविल्यामुळे, अथवा केवळ लिखित पुराव्यांवर विसंबून लिहिल्यामुळे, किंवा काय आहे यापेक्षा काय असावे यावर भर देणारी असल्यामुळे, भाषाघटकांच्या सद्यःकालीन संबंधांकडे दुर्लक्ष करून त्यांच्या व्युत्पत्तीवर भर देत असल्यामुळे सदोष आहेत. समाजातील भाषाव्यवहाराचे पुरेसे नमुने गोळा करून त्यातील वैयक्तिक, तात्कालिक, अपूर्ण, सदोष भाग वगळून जो सारभूत आदर्श भाग उरतो त्याचे विश्लेषण भाषा वैज्ञानिक व्याकरण करते. सोस्यूरने भाषाव्यवस्था आणि भाषाव्यवहार असे भाषेच्या संदर्भात दोन भेद केले आहेत. त्यांपैकी भाषाव्यवस्था म्हणजेच भाषेचे हे आदर्श रूप होय आणि भाषाव्यवहार म्हणजे प्रत्यक्ष व्यवहारातील भाषा होय. सोस्यूरच्या मते भाषाभ्यासकांनी भाषाव्यवहारापेक्षा भाषाव्यवस्थेचा अभ्यास केला पाहिजे. चॉम्स्कीने मांडलेली भाषिक क्षमतेची संकल्पना सुद्धा आदर्श भाषेचीच संकल्पना आहे. चॉम्स्कीसुद्धा भाषाव्यवहारापेक्षा भाषिक क्षमतेवरच लक्ष केंद्रित करतो. त्यामुळे नुसते आदर्श भाषेचे व्याकरण अभ्यासून कोणीही ती मातृभाषा असलेल्या व्यक्तीप्रमाणे बोलू शकत नाही. अगदी पाणिनीचे सर्वांगपरिपूर्ण व्याकरणसुद्धा याला अपवाद नाही.

प्रत्यक्ष समाजात वापरली जाणारी भाषा अशी एकरूप कधीच नसते. तिच्यात अनेक भेद असतात. हे भेद विनाकारण निर्माण झालेले नसतात. समाजांत निर्माण झालेल्या भेदांचे प्रतिबिंब या भाषाभेदांच्या रूपांत पडलेले आढळते. भाषेतील अगदी ठळक भेद म्हणजे भाषेच्या प्रादेशिक बोली, भाषेच्या सामाजिक बोली हे होत. भाषा ज्या ज्या प्रदेशांवर पसरते त्या प्रदेशानुसार तिचे स्वरूप बदलते आणि तिच्यात प्रादेशिक बोली निर्माण होतात. मराठीचेच उदाहरण घ्यायचे झाले तर वऱ्हाडी, नागपुरी, खानदेशी, अहिराणी, डांगी, कोकणी, कुडाळी, पुणेरी या तिच्या प्रादेशिक बोली होत. त्या समाजातील जात, व्यवसाय, शिक्षण, धर्म, वर्ग इ. कारणांमुळे अनेक सामाजिक बोलीही अस्तित्वात येतात. मराठीतील महारी, ब्राह्मणी, लेवा, धनगरी या बोली जातीवर आधारलेल्या आहेत. वाडवळ, किरीस्तावी इ. बोली धर्मानुसार निर्माण

झालेल्या आहेत. मराठीतील वर्गप्रधान बोलींचे नामकरण स्वतंत्रपणे झालेले नसले तरी मध्यमवर्गीयांची बोली आणि झोपडपट्टीतील रहिवाशांची बोली यांत फरक आहे, हे स्पष्ट आहे. ग्रिअर्सनच्या 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' या सर्वेक्षणात मराठीच्या बोली म्हणून ३९ प्रादेशिक बोलींची माहिती दिली आहे. प्रत्यक्षात या बोली यापेक्षा जास्त असण्याची शक्यता आहे. त्याकाळच्या निजाम राज्यातील बोली त्यात वगळलेल्या आहेत. अहिराणी ही गुजरातीची बोली म्हणून ग्रिअरसन सांगतो. सामाजिक बोलींचीही पुरेशी मोजदाद झाली आहे, असे म्हणता येणार नाही, प्रत्यक्षात प्रादेशिक सामाजिक बोलींची मिळून मराठीच्या शंभरावर बोली असतील असे डॉ. सु.वा. कुलकर्णी यांचे मत आहे.

या स्थिर बोलींखेरीज व्यवसायानिमित्त काही अर्धबोलीही अस्तित्वात येतात. व्यापारी लोक गिऱ्हाईकांशी त्यांच्या भाषेत बोलायचा प्रयत्न करतात. त्यातून त्यांची संकरबोली तयार होते. तिलाच 'पिजिन' अशी संज्ञा आहे. ही संकरबोली फक्त व्यवहारापुरती बोलली जात असते. तिचे अस्तित्व गिऱ्हाईक-व्यापारी संवादापुरतेच मर्यादित असते. ती कुणाच्याही घरी बोलली जात नाही. पण हळूहळू ती बोली स्थिर होऊ लागते. ही बाजारातली बोली घराचा उंबरठा ओलांडून घरची बोली बनते. पुढच्या पिढीची ती मातृभाषा बनते, तेव्हा तिला 'स्थिर' संकरबोली किंवा 'क्रेओल' असे म्हणतात. मराठीच्या बाबतीत बंबैया हिंदी, सिंधी व्यापारी-मराठी गिऱ्हाईक यांच्या मध्ये बोलली जाणारी संकरीत मराठी या भाषा 'पिजिन' म्हणता येतील. अलीकडे बंबैया हिंदी ही नवीन पिढीची मातृभाषा झाली आहे. त्यामुळे तिला क्रेओल म्हणायला हरकत नाही. खुद्द मराठी ही देखील एक क्रेओलच आहे, असे डॉ. साऊथवर्थ यांचे मत आहे. क्रेओल जेव्हा एखाद-दुसऱ्या कुटुंबापुरती मर्यादित न राहता सबंध समाजाला व्यापते तेव्हा तिला साहजिकच बोलीचा दर्जा प्राप्त होतो आणि या बोलीचेच जेव्हा प्रादेशिक, सामाजिक भेद निर्माण होतात तेव्हा त्या सर्व समूहाला भाषा असे म्हणतात. इतर सर्व बोलींच्या मध्यवर्ती बोलीला प्रमाणभाषेचा दर्जा प्राप्त होतो. इतर सर्व बोलींना प्रमाणभाषा आकलनक्षम असते. प्रमाणभाषेलाही त्या बोली आकलनक्षम असतात. पण आकलनक्षमता उभयपक्षी कमी होऊ लागते आणि भावनिक जवळीक कमी होऊ लागते तेव्हा एखादी बोली बंडाचा झेंडा उभारते आणि स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व जाहीर करते. कोकणीला आज स्वतंत्र भाषेचा दर्जा मिळाला आहे तो अशाच पार्श्वभूमीवर. मात्र एक खरे की, बोलीभाषकांची जोपर्यंत आपण विशिष्ट भाषेशी निगडीत आहोत अशी श्रद्धा असते, तोपर्यंत कोणीही त्या बोलीला त्या भाषेपासून

तोडून अलग करू शकत नाही. अहिराणी बोली गुजरातीत समाविष्ट करण्याचा प्रयत्न ग्रिअर्सनने केला पण अहिराणी भाषिकांची श्रद्धा अविचल असल्यामुळे ती मराठी भाषेचीच बोली मानली जाते.

भाषेतील प्रादेशिक आणि सामाजिक भेद मोठ्या प्रमाणात स्थिर असतात. त्या त्या बोलीचे भाषक कार्यपरत्वे दुसऱ्या बोलीत किंवा प्रमाणभाषेत व्यवहार करत असले तरी घरी किंवा आपल्या भाषिक समूहामध्ये आपली बोलीच बोलत असतात. अशी ही बोली त्या समूहामध्ये पिढ्या न् पिढ्या टिकून राहते. त्यामुळे हे भेद स्थिर स्वरूपाचे आहेत. विशिष्ट भाषासमूहात आणखीही वेगळ्या प्रकारचे गट तयार होत असतात. समाजातील घटक वेगवेगळ्या कारणांनी एकत्र येत असतात. एकत्र आलेल्या त्या घटकांचा एक गट तयार होतो. या गटात असेतोपर्यंत हे घटक एकच व्यवहार करतात. सर्व घटक त्या गटाचे त्या काळापुरते सदस्य असतात. त्याच विशिष्ट कारणासाठी पुन:पुन्हा एकत्र येत असल्यामुळे त्या गटात काही संकेत निर्माण होत जातात. सर्व घटक त्या काळापुरते त्या संकेतांचे पालन करतात. एका गटातील व्यक्ती भिन्न भिन्न कारणांसाठी आणि व्यवहारांसाठी इतर अनेक गटांशी निगडीत असते. पण विशिष्ट काळासाठी ती ज्या गटात सहभागी झालेली असेल, त्याच्या व्यवहारात ती भाग घेते. त्या गटाचे संकेत पाळते. प्रत्येक गटातील व्यवहार आणि संकेत यांचा त्या गटाच्या भाषेवरही प्रभाव पडतो आणि त्या भाषेचेही संकेत निर्माण होतात. हे संकेत पाळण्याचे बंधन सर्व सदस्यांवर आपोआप येते. या गटांना व्यवहारक्षेत्र अथवा डोमेन **(domain)** असे म्हणतात आणि त्या व्यवहारक्षेत्रातील भाषाव्यवहाराला व्यवहारक्षेत्रीयभाषा असे त्या अनुषंगाने म्हणतात.

ही व्यवहारक्षेत्रे सर्व समाजांसाठी सारखी नसतात. ती त्या त्या समाजाच्या गरजेनुसार आणि संस्कृतीनुसार निर्माण झालेली असतात. तथापि, स्थूल मानाने त्यांची यादी देता येईल. कुटुंब, क्रीडांगण, मित्रमंडळ, बाजार, शिक्षण संस्था, साहित्यक्षेत्र, पूजास्थान किंवा धार्मिक संस्कार स्थान, मनोरंजन, विवाहविधी सारखे कौटुंबिक सामाजिक समारंभ, प्रशासकीय कार्यालय, न्यायालय या प्रकारची व्यवहारक्षेत्रे बहुतेक सर्व प्रगत समाजात आढळून येतात. त्या त्या व्यवहारक्षेत्रांनुसार भिन्न भिन्न भाषाभेद त्या त्या समाजात आढळून येतात. एकाच प्रकारच्या व्यवहारामुळे तेथे निर्माण झालेल्या स्थिर संकेतांमुळे, त्यांनी प्रभावित झालेल्या भाषाभेदालाही स्थैर्य प्राप्त झालेले असले तरी ते वापरणारे सदस्य मात्र तेच नसतात. प्रत्यक्षात पाणी पुढे वाहून जात असले तरी त्यामागून येणाऱ्या पाण्यामुळे प्रवाह मात्र स्थिर वाटावा तसे या व्यवहारक्षेत्रातील





अनुक्रमणिका

भाषाव्यवहाराचे असते. एकच व्यक्ती एका वेळेला इतर अनेक व्यवहारक्षेत्रांशी निगडित असल्यामुळे त्या त्या क्षेत्रातील भाषाव्यवहाराशी परिचित असते आणि गरज पडेल त्या वेळी त्या त्या भाषेचा वापर करू शकते. ज्या व्यवहारक्षेत्रात जी भाषा वापरली तिचा त्या त्या ठिकाणी वापर करण्याच्या कौशल्याला संज्ञापनकौशल्य असे म्हणतात. प्रत्येक व्यक्तीला असे संज्ञापनकौशल्य वापरावे लागते. विशिष्ट व्यवहार क्षेत्रात विशिष्ट भाषा वापरली नाही तर औचित्यभंगाचा दोष पदरी येतो. म्हणून समाजातील सर्व व्यक्ती हे भाषाविषयक संकेत पाळण्याविषयी दक्ष असतात.

या व्यवहारक्षेत्रीय भाषिक संकेतांचे स्वरूप स्पष्ट करणे हा या निबंधाचा उद्देश नाही. शिवाय तो स्वतंत्र अभ्यासाचा विषय ठरेल. तथापि स्थूल मानाने या विविध व्यवहार क्षेत्रीय भाषांचे दोन गट पडतात - औपचारिक आणि अनौपचारिक. सर्वसामान्यपणे कुटुंब, क्रीडांगण, मित्रमंडळ, बाजार या व्यवहारक्षेत्रात अनौपचारिक भाषा वापरली जाते. तर प्रशासकीय कार्यालय, न्यायालये, शिक्षणसंस्था, धार्मिक स्थाने या व्यवहारक्षेत्रात औपचारिक भाषा वापरली जाते. विवाहसमारंभ, साहित्य इ. ठिकाणची भाषा औपचारिक आणि अनौपचारिक अशा संमिश्र स्वरूपाची असते. साहित्याखेरीज इतर लेखनव्यवहाराची भाषा औपचारिकच असते. न्यायव्यवहार, प्रशासकीय व्यवहार यांमधील भाषा फारच औपचारिक असते. याचा अर्थ कुटुंबादी क्षेत्रातील भाषा पूर्णपणे उपचारमुक्त असते असे म्हणता येत नाही. किंवा प्रशासकीय व्यवहारात अथवा न्यायालयीन व्यवहारात सदैव उपचाराचेच बुरखे चढवलेले असतात, असेही नाही. 'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति' या न्यायाने हे अगदी ढोबळ दिग्दर्शन केले आहे.

अनौपचारिक भाषेमध्ये विषयाचे बंधन नसते, तसेच त्यांसाठी वापराव्या लागणाऱ्या भाषेचेही बंधन नसते, या व्यवहारातील सर्व व्यक्ती मुक्तपणे बोलत असतात. याउलट औपचारिक भाषाव्यवहाराचे विषय ठरलेले असतात. त्यासाठी वापराव्या लागणारे भाषेचे स्वरूपही निश्चित असते. अनौपचारिक भाषेमध्ये जवळिकीची भावना असते आणि औपचारिक भाषेमध्ये त्या मानाने दुरावा असतो, असाही एक भेद सांगितला जातो. पण अनौपचारिक भाषेमध्ये जशी जवळीक व्यक्त होऊ शकते त्याचप्रमाणे शिव्यागाळीही होऊ शकते. पण एवढे मात्र खरे की कोणत्याही प्रकारच्या भावनांच्या अभिव्यक्तीला अनौपचारिक भाषाच आवश्यक असते. औपचारिक भाषा वस्तुनिष्ठ तटस्थता व्यक्त करत असते. औपचारिक भाषाव्यवहारात विषयाचे स्वरूप चटकन कळावे अशी अपेक्षा असते. कारण या व्यवहारात अवांतर गोष्टींना वाव नसतो. एकदम विषयालाच हात घातलेला असतो.





अनुक्रमणिका

एका व्यवहारक्षेत्रातील भाषासुद्धा एकरूप असेलच याची खात्री देता येत नाही. कारण तेथे सहभागी व्यक्ती कोणती भूमिका वठवत आहेत, त्यांच्या संभाषणाचे विषय काय आहेत, त्यांच्या संभाषणाची पार्श्वभूमी काय आहे यावरून भाषाव्यवहाराचे स्वरूप ठरते. दोन मित्र धार्मिक कार्याच्या निमित्ताने एकत्र भेटतात, तेव्हा धार्मिक कार्यान्तर्गत भाषाव्यवहार करताना (मंत्र म्हणणे इ.) त्या क्षेत्राची व्यवच्छेदक भाषाप्रणाली वापरतील. पण धार्मिक कार्यातून मोकळे झाल्यानंतर मित्रत्वाच्या अनौपचारिक गप्पा मारत बसतील. कौटुंबिक पर्यावरणात अनौपचारिक भाषा वापरायची असते हे खरे, पण प्रत्यक्षात भाषाव्यवहार कोण कुणाशी बोलत आहे यावर अवलंबून असतो. बाप-मुलगा, मुलगा-बाप, मुलगा-मुलगा, आई-मुलगा, मुलगा-आई, आजोबा-मुलगा, मुलगा-आजोबा, सासू-सून, सून-सासू, असे अनेक प्रसंग त्यात शक्य असतात आणि त्यातील भाषाव्यवहार भिन्न भिन्न असतात. ते भाषाव्यवहार त्यातील पात्रे, त्यांमधील प्रसंगाची पार्श्वभूमी, त्या समाजाच्या औचित्यविषयक कल्पना, इत्यादीं वर अवलंबून असतात. त्यातील त्या त्या घटकांनुसार त्यांचे स्वरूप बदलत असते.

अशा तऱ्हेने भाषाव्यवहार आणि बोलीभेद यांतील फरक स्पष्ट करायला हवा. बोलीभेदांच्या बाबतीत प्रत्येक भेद बोलणारा समाज इतर समाजापेक्षा वेगळा असतो. तेथे समाजाचे जवळजवळ हवाबंद कप्पेच झालेले असतात. त्यामुळे तेथे एका संकेतव्यवस्थेकडून दुसऱ्या संकेतव्यवस्थेकडे जाण्याचे प्रकार कमी आढळतात. पण व्यवहारक्षेत्रीय भाषाव्यवहारात संकेतव्यवस्था-बदल अपेक्षितच असतो. या व्यवहारक्षेत्रांमुळे समाजाची शकले पडलेली नसतात. ही व्यवहारक्षेत्रे परस्परांशी स्पर्धा करत नसून, ती एकमेकांना पूरक असतात. या सर्व व्यवहार क्षेत्रांचे मिळून त्या संपूर्ण समाजाचे चित्र पूर्ण होत असते. त्यामुळे ही व्यवहारक्षेत्रे संख्येने जितकी अधिक, त्यांमधील परस्परसंबंध जितके संमिश्र तेवढा तो समाज अधिक प्रगत आणि एकसंध असेही म्हणता येईल.

काही समाजात बोलीव्यवहार आणि लेखनव्यवहार यांत खूपच अंतर असते. तेथे बोलीव्यवहारासाठी वेगळा शब्दसंग्रह, वेगळ्या वाक्यरचना, आणि लिखित व्यवहारासाठी वेगळा शब्दसंग्रह, वेगळ्या वाक्यरचना अशी व्यवस्था असते. तिला डायग्लोसिआ अथवा दुहेरी संकेतव्यवस्था असे म्हणतात. बंगाली भाषा, तमिळ भाषा यामध्ये असा प्रकार आढळतो. मराठीत असा प्रकार प्रकर्षाने जाणवणारा नसला तरी मराठी अशा दुहेरी संकेत व्यवस्थेपासून पूर्णपणे अलिप्त आहे असे म्हणता येत नाही. मराठीत पद्यभाषेचा शब्दसंग्रह आणि व्याकरण व्यवहारभाषेपेक्षा भिन्न असतात, हे तर स्पष्ट आहे. जल, नीर, पय, उदक, वारि हे सगळे 'पाणी' या अर्थाचे शब्द

फक्त कवितेतच येतात. व्यवहारभाषेत ते आढळत नाहीत. 'नळे इंद्रासी असे बोलिजेले', 'आता विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।' या प्रकारच्या वाक्यरचना पद्यातच येतात. व्यवहाराच्या भाषेत ते आढळणार नाहीत. पद्यभाषेचे क्षेत्र वगळले तरी गद्यरूप लेखनातही व्यवहार भाषेपेक्षा शब्दसंग्रह, व्याकरण या बाबतीत बरेच अंतर पडते. मोठमोठी संयुक्त अथवा मिश्र वाक्ये, दीर्घ सामासिक शब्द, बोलण्याच्या भाषेत सहसा भेटत नाहीत. 'शिपायाकडून चोर पकडला गेला' अशा प्रकारच्या वाक्यरचना, विदग्ध अलंकारांचा वापर इ. ची बोलीभाषाव्यवहारात अपेक्षा नसते. पण या गोष्टी व्यवहाराचे जवळजवळ अविभाज्य अंग झालेल्या असतात. तेव्हा मराठीतही डायग्लोसिआ किंवा दुहेरी संकेतव्यवस्था प्रच्छन्नपणे वावरताना दिसते.

मानवी भाषाव्यवहाराची विज्ञान, साहित्य, दैनंदिन जीवन ही तीन क्षेत्रे घेतली तर त्यातील भाषेचा वापर किती वेगळ्या वेगळ्या प्रकारचा असतो, हे लक्षात येईल. विज्ञानाची भाषा अगदी काटेकोर आणि काटेतोल असावी अशी अपेक्षा असते. त्यामुळे तेथे एका चिन्हाचा एकच अर्थ मिळेल अशीच भाषा वापरण्यात येते. नित्याच्या जीवनात आपण एवढे सावध नसतो. त्यामुळे बोलताना आपण भाषा बरीच शिथिलपणे वापरतो. क्वचित गोळाबेरीज शब्दयोजना करतो आणि वेळ भागवून नेतो. एका चिन्हाचे कधी दोन, कधी तीन असेही अर्थ संभवतात. पण बोलणाऱ्या व्यक्ती, त्यांचे परस्परसंबंध, प्रसंग इ. नी त्या भाषाव्यवहारातील संदिग्धता कमी होते. पण साहित्याच्या भाषेत या दोहोंहून वेगळी परिस्थिती असते. तेथे सूचकतेला अधिक महत्त्व असते. त्यामुळे एका चिन्हाने अनेक अर्थ प्रस्फुरित करण्याची मुद्दाम काळजी तेथे घेतलेली असते. वरवर साध्या दिसणाऱ्या उद्‌गारांत अनेक अर्थच्छटा अभिव्यक्त करण्याची किमया साहित्यात साधलेली असते. यालाच ध्वनी अथवा व्यंजना असे म्हणतात. शास्त्राची भाषा वस्तुनिष्ठ असून तिच्यातून फक्त ज्ञानाचे वहन होते. कोणत्याही प्रकारची भावना तेथे हेतुतः टाळलेली असते. व्यवहारात भावना, विचार, निरर्थकता, इ. प्रकारची सरमिसळ होत असते. तर साहित्याच्या भाषेत भावुकतेचे पारडे खूप खाली झुकलेले असते.

समाजातील व्यवहार क्षेत्रानुसार त्या त्या क्षेत्रात वापरल्या जाणाऱ्या भाषेवर प्रभाव पडतात आणि भाषाव्यवहाराचे स्वरूप बदलते, हे वर पाहिले. त्यात भाग घेणाऱ्या व्यक्ती, त्यांचे विषय, त्यांचे परस्पर संबंध, आणि त्यांच्या भोवतालचे वातावरण यांचा खूप प्रभाव पडतो हेही आपण पाहिले. याच घटकांप्रमाणे समाजाला उपलब्ध असलेल्या व्यवसायक्षेत्रांचाही निर्देश केला पाहिजे. या व्यवसायक्षेत्रात गरजेनुसार

विशिष्ट परिभाषा निर्माण झालेल्या असतात आणि त्या परिभाषा वापरणे त्या त्या व्यवसायापुरते सोयीचे असते. कित्येक वेळा अपरिहार्य असते. या क्षेत्राबाहेरील माणसाला त्या परिभाषेवाचून त्या भाषाव्यवहारात सहभागीही होता येत नाही. त्या त्या क्षेत्रातील संबंधित परिभाषेला त्या क्षेत्रांची लघुशब्दावली अथवा रजिस्टर अशी संज्ञा आहे. निरनिराळ्या व्यवसायक्षेत्रांत अशा स्वतंत्र लघुशब्दावल्या निर्माण झालेल्या असतात. वैद्यकीय व्यवसाय, रेल्वेस्टेशन, न्यायालय, शिक्षणसंस्था, व्यापारी पेढी, क्रिकेटसारखे खेळ यांसारख्या क्षेत्रांत अशा लघुशब्दावल्या आढळतात.

व्यवहारक्षेत्रसापेक्ष भाषाभेद आणि व्यवसायक्षेत्रनिष्ठ लघुशब्दावली यांतील फरक असा की व्यवहारक्षेत्र सापेक्ष भाषाभेद हा संपूर्ण भाषिक अभिव्यक्तीच्या शैलीचा प्रकार आहे. तर लघुशब्दावली हा केवळ त्या क्षेत्रातील परिभाषेशी निगडित असा प्रकार आहे. अर्थात भाषाभेदांच्या संदर्भात दोन्ही प्रस्तुत आहेत.

याच संदर्भात व्यक्तिगत भाषानिधीचाही उल्लेख करणे आवश्यक आहे. व्यक्ती आपल्या आयुष्याच्या कालावधीत जे शब्द वापरते, ज्या विविध वाक्यरचनांना वापर करते त्या सर्वांचा एकत्रित संग्रह केला तर तो त्या व्यक्तीचा भाषानिधी **Language repertoire** होईल. सर्वसाधारणपणे एक सामान्य माणूस आपल्या आयुष्यात जास्तीत जास्त २०,००० शब्दांचा वापर करतो असे निदर्शनास आले आहे. साहित्याच्या क्षेत्रातील व्यक्तींचा हा संग्रह जास्तीत जास्त २५,००० शब्दांपर्यंत जाईल. पण त्यापेक्षा मोठा शब्दसंग्रह सहसा आढळत नाही. प्रत्येक व्यक्तीचा शब्दसंग्रह असा २०-२५ हजारांच्या दरम्यान असला तरी कोणत्याही दोन व्यक्तींचे शब्दसंग्रह अगदी तंतोतंत सारखे कधीच नसतात. त्यामुळे समाजातील सर्व व्यक्तींच्या शब्दसंग्रहाच्या संकलित संग्रहाची व्याप्ती दोन चार लाखांपर्यंत सहज जाते. हा मुद्दा येथे मांडण्याचे कारण हे की, प्रत्येक व्यक्तीने आपल्या कुंपणाची व्याप्ती ओळखावी. दुसऱ्या व्यक्तीचा शब्दसंग्रह आपल्या शब्दसंग्रहापेक्षा तुटपुंजा आहे, अशा भ्रमात तिला हिणवण्याचे प्रकार बरोबर नाहीत. कारण त्या व्यक्तीच्या शब्दसंग्रहात एखाद्या ठिकाणी कमतरता आढळली तरी ती कमतरता तिने दुसऱ्या ठिकाणी भरून काढलेली असते आणि क्षमतेच्या दृष्टीने सर्वच माणसे एकाच पातळीवर वावरत असतात, हे लक्षात घ्यावे.

□□□

**श्रीदीपक सहकारी गृहरचना संस्था, १२/३,**
**तुळशीबागवाले कॉलनी, गोळवलकर गुरुजी रस्ता,**
**पुणे- ४११००९. दूरध्वनी- ४२२५६०३**





अनुक्रमणिका

# भाषेचे दालित्य

**देवीदास बागूल**

भाषा दलित आहे हे वरवर तरी कोणीही कबूल करणार नाही. भाषा समर्थ आहे, मनातल्या इच्छा-आकांक्षा, हृदयातले भाव-विभाव, बुद्धीचे तर्क-कुतर्क व्यक्त करण्यात भाषा श्रीमंत आहे असाच सर्वसाधारण समज आहे. माणसाचा रोजचा व्यवहार सुरळीतपणे होण्यात भाषेची मदत मोठ्या प्रमाणात होत असते असाच सगळ्यांचा अनुभव आहे.

असे असूनसुद्धा कधीकधी वाटते की आज भाषा अपुरी पडते. नुसते वाटत नाही, तर अनुभव येतो की आज आपल्याला जे काही सांगायचे आहे ते शब्दांनी सांगता येत नाही. शब्द थिटे पडत आहेत. जे काही सांगायचे आहे ते शब्दांच्या पलीकडचे आहे. जे काही मनात आहे, हृदयात आहे, डोक्यात आहे ते फार फार अपार आहे, तरल आहे, अपूर्व आहे, अज्ञेय आहे. जे काही सांगायचे आहे ते असांकेतिक आहे, अनाहत आहे. त्या अनाहतासाठी आहत भाषा समर्थ नाही, दलित आहे.

दोन प्रेमी काही एका मर्यादेपर्यंत शब्दांच्या मदतीने आपापले प्रेम व्यक्त करतात. मग असा एक टप्पा येतो की वाटते आपले हृद्‌गत भाषेतून सांगितले जात नाही, जे काही आत अंकुरते आहे ते शब्दांतून प्रकट होत नाही. अशा वेळी मग ते दोन प्रेमी नुसते एकमेकांजवळ बसून राहतात. दलित भाषेचा नाद सोडून अनाहताचा हात धरतात.

ह्यालाच सत्संग असे म्हटले आहे. आम्ही दोघे बरोबर राहू, जवळजवळ राहू. कदाचित अशा बरोबर राहण्यामुळे जे सरळसरळ दिले जात नाही, ते दिले जाते; घेतले जाते, जाणले जाते. आवाज न करता गुपचूप समजले जाते. ते शब्दात सांगता आले नाही ते मौनात उतरल्यामुळे आकळले जाते, संक्रमित होते. दलित भाषा गळून पडते, समर्थ मौन अर्थपूर्ण होते.

काही आयाम असे आहेत की, असे गहन आहेत की, जेथे जाणणे आणि जगणे यांत फरक करता येत नाही. जेथे तुम्ही तसे झालात तरच तुम्ही जाणलेत असे असते. ज्या ठिकाणी 'टु बी इज द ओन्ली वे टु नो.'

पण होणे ही गोष्ट फार कठीण आहे. कारण जाणणे म्हणजे काय? तर आपल्याला काही शब्द माहीत होणे, काही सिद्धांत माहीत होणे. एखादी फिलॉसॉफी, एखादे शास्त्र. आपली बुद्धी शब्दांनी भरून जाते, सिद्धांतांनी गच्च होते. पण हृदय

मात्र रिकामे राहते आणि भरलेली बुद्धी व रिकामे हृदय - ही स्थिती तर फारच धोकादायक आहे. उदाहरणार्थ, प्रेमावरचे सगळे ग्रंथ वाचलेले असावेत. प्रेमावरच्या सगळ्या कविता पाठ असाव्यात. प्रेमाच्या सगळ्या रीतिभाती माहिती असाव्यात. अशा माहितीने परिपूर्ण बुद्धीला वाटते की आता मला प्रेम म्हणजे काय ते समजले आणि इथेच धोका असतो. कारण हृदयात काहीच उतरलेले नसते. म्हणून मग प्रेयसीने नकार देताच हा बुद्धिसमृद्ध प्रियकर प्रेयसीला जाळून टाकतो, तिच्या डोक्यात पिस्तुलाची गोळी झाडून मोकळा होतो, दीन होतो, दरिद्री होतो; भाषेने समृद्ध झालेली बुद्धी, भाषेचे दालित्य न समजल्यामुळे भावनेच्या बाबतीत कावराबावरा होतो, दलित होतो.

आपण म्हणतो की शांत मन. पण ही शब्दांची भूलचूक आहे. जोपर्यंत मन आहे तोपर्यंत अशांतता ही असणारच असणार. अशांतीचेच नाव मन असे आहे. अशांती आणि मन, जोवर अस्तित्वाचा संबंध आहे, तोवर अशांती आणि मन हे शब्द पर्यायवाची आहेत. शब्दकोशात असा पर्यायवाची अर्थ नाही. शब्दकोशात शोधायला जाल तर कुठेही अशांती म्हणजे मन असा अर्थ दिलेला सापडणार नाही; आणि मन म्हणजे अशांती असाही अर्थ दिलेला सापडणार नाही.

जे लोक भाषा तयार करतात, त्यांनी अस्तित्व जाणलेले असले पाहिजे याची आवश्यकता नाही. अस्तित्व जाणणारे लोक म्हणतात की भाषेमध्ये काही सांगणे कठीण आहे, म्हणून आम्ही भाषा तयार करीत नाही. अस्तित्वाचा अनुभव असा आहे की जेथे अशांतता आहे तेथेच मन आहे. मन म्हणजेच अशांती. म्हणूनच 'शांत मन' असा शब्दप्रयोग बिलकूल विरोधाभासी आहे.

अस्तित्वाला जाणायला निघालेले लोक म्हणूनच भाषेच्या दालित्याला मागे टाकून उपनिषदाचा आश्रय करतात. उपनिषद म्हणजे जे अस्तित्व गुरूच्या जवळ बसून जाणले गेले. गुरूच्या जवळ 'बसून' जाणले गेले. गुरूची भाषा, गुरूचे शब्द ऐकून नाही, गुरूच्या जवळ बसून. कारण ऐकायला फक्त शब्दच येतात. पण जवळ बसल्यामुळे आणखीसुद्धा काही मिळते. आणि जवळ बसणे ही एक कला आहे. ऐकणे सोपे आहे, फार सोपे आहे; जवळ बसणे फार कठीण आहे.

उपनिषदचा अर्थ आहे गुरूच्या जवळ बसून जे काही मिळाले - फक्त जवळ बसून. त्याच्या निकट बसणे, त्याच्या समीप राहणे, त्याच्या ठिकाणी समर्पण करून, त्याच्यावर प्रेम करून, त्याच्या ठायी स्वतःला मिटवून, त्याच्याजवळ स्वतःला विसरून जे काही मिळाले ते. म्हणूनच वस्तुतः गुरू जे बोलतो ते महत्त्वपूर्ण नसते. गुरू जे असतो तेच महत्त्वपूर्ण आहे. कारण जो बोलतो त्याचे बोलणे ऐकता येते, आणि

जो असतो, ज्याचे अस्तित्व असते त्या अस्तित्वाच्या जवळ बसता येते, बसून जाणता येते. त्या जवळ बसण्यात, त्या निकटतेमध्ये चेतना एक-दुसऱ्यात आरपार प्रवेश करायला लागते. समीपतेत मधली दारे उघडली जातात, आणि चेतना एक दुसऱ्यात ये-जा करू लागते.

आणि ज्या दिवशी हा चेतनेचा प्रवाह आतमध्ये येतो त्या दिवशी उपनिषद घटित होते.

भाषेचे दालित्य आणखीही एका प्रकारे लक्षात येते. एका समूहाची भाषा दुसऱ्या समूहाला समजत नाही. कानडी माणसाला मराठी भाषा समजत नाही. फ्रेंच माणसाला तमीळ भाषा समजत नाही. त्यावेळी भाषा किती दलित आहे हे लक्षात येते. पण एक सूर दुसऱ्या कोणत्याही समूहाला समजतो, जाणवतो. भारतीय संगीत युरोपीय समूहाला स्पर्श करते. युरोपीय संगीत भारतीयाला जाणवते. संगीत हे अस्तित्व आहे. भाषा हे अस्तित्व नाही. चित्र हे अस्तित्व आहे. भाषा हा संकेत आहे. नृत्य हे अस्तित्व आहे, भाषा हा भ्रम आहे.

म्हणूनसुद्धा संगीतार्थापेक्षा संगीताशय हा श्रेष्ठ, समर्थ समजला जातो.

□□□

**आधारग्रंथ : रजनीशांची प्रवचने**

**६५/२० एरंडवणे, कृतांजली,**

**पुणे ४११००४**

---

## नाव

आचार्य अत्र्यांना कुणी तरी एकदा विचारलं, 'साहेब तुम्ही कुणावर टीका करताना त्यांच्या नावाची का टिंगल उडवता? मोरारजी देसाई, स. का. पाटील, ह. रा. महाजनी यांच्यापासून तर मा. का. देशपांडे, उद्धव शेळके...'

साहेब हसून म्हणाले, ''आमचा तो पहिला प्रहार असतो! लहानातल्या लहान माणसांपासून मोठ्यातल्या मोठ्या माणसांपर्यंत पहिलंत, तर त्याचं नाव हा त्याचा प्रथम मानबिंदू असतो. तुकाराम, सखाराम या काय शिव्या का आहेत? पण तुकारामला तुम्ही सखाराम म्हणा, त्यांच्या मानबिंदूला धक्का लागतो. तसंच सखारामला तुकाराम म्हटलं, की अपमान झाल्यासारखा वाटतो. अभिमान धरण्यासारखा ज्याच्याजवळ एकही गुण नसतो, त्याला आपल्या नावाचा तरी अभिमान असतोच असतो. म्हणून आम्ही पहिला वार या मर्मस्थानीच करतो!''

□□□





अनुक्रमणिका

# आंधळं पोर

*कोरिना बिय (स्वित्झर्लंड) या लेखिकेच्या फ्रेंच कथेचा अनुवाद*

**अनुवादक : नीलिमा रड्डी**

मी आगगाडीतून चालले होते. खिडकीजवळची जागा मिळाली होती. वसंतऋतूतल्या लोभस उन्हांत बाहेरचा परिसर उजळून निघाला होता. तांबूस मातीत लागवड केलेल्या द्राक्षबागा डोळ्यांना सुखवत होत्या. भोवताली मोरचुदाचा हात दिलेल्या भिंती. जणू कलाकाराच्या पेल्यात जपून ठेवलेला लालसर रंग! मोठं मनोरम दृश्य होतं ते.

तेवढ्यात एक तरुणी माझ्याजवळ येऊन म्हणाली, ''तुम्ही व्हालेपर्यंत जाताय् ना? मला पुढच्या स्टेशनवर उतरायचंय. या अंध मुलाकडे बघाल का तुम्ही?''

''अं? बरं......''

''तिकिट तपासनिसांनी त्याला लोझानला माझ्या ताब्यात दिलं होतं. तो गावी चाललाय. त्याचे पालक येतीलच स्टेशनवर.''

''ठीक आहे, आणा त्याला इथं.''

माझ्याशी बोलणाऱ्या तरुणीचा हात पकडून तो अंध मुलगा लगेच आला. आठेक वर्षांचा, बारीक अंगकाठीचा मुलगा. नीटनेटके कपडे घातलेला, लांबट, फिकुटलेल्या चेहेऱ्याचा. पण माझं लक्ष वेधून घेतलं, ते फक्त त्याच्या पापण्यांनी; कायमच्या घट्ट मिटलेल्या पापण्यांनी. त्या उघडण्याच्या व्यर्थ प्रयत्नात त्याचं डोकं सारखं पुढं झुकलेलं होतं. एक आंधळा डोळे उघडण्यासाठी धडपडत होता!

-''हा असा.... जन्मतःच आहे का?'' मी त्या तरुणीला विचारलं.

''असावा बहुतेक.''

''आणि हे.... असंच... राहणार कायम?''

''तसंच वाटतंय् एकंदरीत.''

आयुष्यात प्रथमच मी अशा विलक्षण प्रसंगाला तोंड देत होते. समोरच्या माणसाला एकदम गोठून गेल्यासारखं झालंय हे या विकलांगांना समजत असेल का एखाद्या आंतरिक शक्तीने? त्यांना भेटल्यावर इतरांना एकदम बसलेला धक्का आणि स्वाभाविकपणे मनात उसळून आलेली किळस, अपंगांना जाणवत असेल का?

नक्कीच!

काय करावं ते मला सुचेना. बुडत्याला काडीचा आधार म्हणून मी खिशात हात घातला; एक गोळ्यांचा पुडा हाताला लागला तो बाहेर काढला आणि त्यांतली एक

गोळी त्या मुलाच्या हातात दिली. पण त्याने 'नको' म्हणून ती माझ्याकडे परत केली!

.....एकदम माझ्या लक्षात आलं की आंधळ्या माणसांचे हात आपल्या हातांपेक्षा किती निराळे असतात. ते मुळी 'हात' नसतातच. ते अँटेना असतात. सभोवतालचा शोध घेणारे, पूर्वसूचना देणारे, अनेक वस्तूंच्या अस्तित्वाची जाणीव देणारे. या पोराच्या हाताची बोटं घट्ट आवळलेली होती. कधी तो भोवतालच्या मिट्ट अंधाराकडे आपले हात पुढे झेपावत होता तर कधी मागे खेचून घेत होता. कधी तरी ते आकसून ठेवीत होता तर कधी सैलावून तो अवतीभवती फिरवीत होता. मधेच तो काहीतरी पुटपुटला.

''तो काय बोलतो, ते आपल्याला समजतही नाही.'' ती तरुणी म्हणाली. तेवढ्यात तिचं स्टेशन आलं आणि ती डब्यातून उतरून गेली.

बुजून, संकोचून गेलेलं ते पोर बाकावर, अंग चोरून बसलं होतं. बावचळून गेल्यामुळे त्याच्या शरीराच्या विचित्र हालचाली होत होत्या. त्याची मान पार खांद्यात रुतून गेली होती जणू. अंगाभोवती लपेटलेल्या भल्याथोरल्या कोटाच्या कॉलरीमध्ये अर्धामुर्धा चेहराही लपून गेला होता. त्या कोवळ्या चेहेऱ्याचा रेखीवपणा आत्तापर्यंत माझ्या लक्षात आला नव्हता. आत्तापर्यंत तो चेहेरा माझ्या लेखी कुरूप होता. कारण मुख्य म्हणजे त्याला 'डोळे' नव्हते!

त्याला कंटाळा येऊ देता कामा नये, असं वाटून मी त्याला जरा आरामशीरपणे माझ्याशेजारीच बसवलं. त्याला धीर आलेला दिसला आणि त्याच्या विचित्र हालचाली थांबल्या. त्यानं माझ्या खांद्यावर डोकं टेकलं आणि माझ्या हातात आपला हात सोपवून दिला. एकदम मला त्याची ताई झाल्यासारखं वाटलं. म्हटलं, झोपणार आता स्वारी पण त्याला झोपायचं नव्हतं. त्यानं मला प्रश्न विचारायला सुरुवात केली, आपल्या बालसदृश कोवळ्या पण एकसुरी आवाजात. तो काय म्हणतो, ते नीट कळावं म्हणून मी मान खाली झुकवून ऐकू लागले. तो माझ्याशी बोलत नव्हता, माझ्या 'कडे'ही बोलत नव्हता. त्याच्या भोवताली सर्वत्र भरून राहिले काळोखाला तो प्रश्न विचारीत होता. ही काळोखी रात्र त्याच्या अंतरंगांतही भरून राहिली होती- त्याचं सारं जगच अनंत, अरूप अंधारानं व्यापलेलं होतं- त्याचे प्रश्न मला निरुत्तर करून सोडत होते. अस्वस्थ करून टाकत होते.

एका आंधळ्याच्या जगात प्रवेश करण्याची माझी धडपड चालू झाली. कोणतीही संकल्पना सोपी करून सांगताना फक्त संवेदनांचा मला आधार घ्यायचा होता - महाकठीण काम होतं हे. दृष्टीचं वरदान असल्यामुळे मला जे जगाचं आकलन





अनुक्रमणिका

झालं आहे, त्याचा इथं काही उपयोग नव्हता. मी पाजळलेली अक्कल इथं व्यर्थ ठरत होती. डोळस माणसाचं पांडित्य कितीही बाजूला ठेवू म्हटलं तरी ते मधेमधे अडमडत होतं. मी वापरत असलेले शब्द अक्षरशः मूक ठरत होते. मला लाज वाटली खरंच. मी वापरलेले काही शब्द त्याला समजल्यासारखे वाटले, पण त्यांची संख्या नगण्य होती.

''आपण कुठे चाललोय?'' त्यानं विचारलं.

''गावी.''

''आणि मग?''

''तिथे तुझे पालक येतील तुला न्यायला.''

''पालक म्हणजे काय?''

''...................''

''आणि मग?''

आगगाडीच्या त्या रिकाम्या डब्यात त्याच्या ह्या ''आणि मग?'' चा नाद विलक्षण भयाण वाटत होता. जणू त्याचा हा प्रश्न साऱ्या अदृश्य जगाला उद्देशून फेकला होता आणि त्या जगापाशी त्याला काहीच उत्तर नव्हतं.

''आपण सीमारेषा पार केली?''- तो

''नाही अजून. आपण लाव्होमध्येच आहोत. पण आता लवकरच गाडी व्हाले परगण्यात जाईल.''

''सीमारेषा कुठे आहे?''

''ती ओलांडताना मी सांगेन तुला.''

त्याने आपला हात खिडकीच्या दिशेने उंचावला.

''इथं काय आहे?''

''माळरानं आहेत. तुला माहितीये माळरान कसं असतं ते?''

''हो गवत ना? आ---हा....! गवत! काय मज्जा येते गवतावर बसायला!''

या शब्दानं तो अगदी हरखून गेला. बहुधा त्या शब्दांतून त्याला काही आनंदाचे क्षण आठवले असावेत. मोकळी हवा, गवताचा गंध, सूर्यकिरणांचा उबदार स्पर्श, किड्यांची किर्रकिर्र....

''तिथं गवत आहे?'' त्यानं खाली बोट दाखवत विचारलं - त्याला बाकावरून खाली उतरायचं होतं.

''नाही- तू आगगाडीच्या डब्यात आहेस. गवत डब्याच्या बाहेर आहे.''

''ह्या बाजूला?''

''हो आणि पलीकडच्या बाजूला तळं आहे. अं... पाणी आहे.''

''पाणी! वाहवा!''

त्याला 'गवत' माहीत होतं. 'पाणी' समजत होतं, मला आता धीर आला. आनंदच झाला म्हणा ना! पण हे 'सीमारेषा' प्रकरण मात्र त्याला सतावत होतं. बुचकळ्यात पाडत होतं.

''तिथे आहे सीमारेषा?'' आमच्या पलिकडच्या बाकाला बोट लावून त्याने विचारलं. आता कसं समजवावं ह्या पोराला... सीमारेषा ही एक अदृश्य कल्पना आहे. दृष्टी असलेल्यांनाही ती 'दिसत' नाही...

-''नाही, नाही-- ते तर टणक लाकूड आहे.''

-'' आपण पडलो तर ?''

-''नाही रे. पडू कसे? भिऊ नकोस.''

मग अचानक तो म्हणाला,,

-''सीमारेषा ऱ्हॅं नदीवर आहे.''

मी दचकलेच! परत त्यानं विचारलं-

-''ते जर्मनलोक कुठे आहेत?''

-''खूप दूर आहेत इथून.''

याचवेळी काही प्रवासी मागील डब्यांतून आमच्या डब्यात शि़रले व आमच़्या बाकाजवळून पलीकडे जाऊ लागले-

-''कोण आहे?''

-''काही लोक चालत गेले इथून.''

-''चालत कसे गेले ?''

-''कसे म्हणजे? आपल्या पायांनी.''

त्याच्या काही प्रश्नांनी मी अवाक् झाले होते. भांबावून गेले होते. पण मग मात्र मला भराभर उत्तरं सुचायला लागली- साधी भीतिदायक वाटावी इतकी स्पष्ट बाळबोध उत्तरं. ऱ्होन नदीवरच्या पुलावरून आगगाडी चालली होती.

-''आतां आपण आलो बरं का व्हालेमधे.''

-'' व्वा !'' तो खूष झाल्यासारखा वाटला.

-''हे आता सँ मोरीस आलं हं !''

-''आणि मग ?''

-''मग मार्तिंत्री -नंतर सियाँ.''

त्यानं आपला हात वर उचलून माझं डोकं शोधलं आणि ते स्वत:कडे ओढून घेतलं. मला कळलं- इतका वेळ जिच्याशी बोलतोय ती व्यक्ती आहे तरी कशी ते त्याला समजावून घ्यायचं होतं- त्यानं माझ्या कोटाला हात लावला- मग माझी टोपी चाचपली. खरंच, आपला स्पर्श त्यामानाने किती वरवरचा असतो. हा छोटासा हात किती 'समजू' शकतो हे थक्क करणारं होतं.

-''पाह्यलंस? चांगली अुंचनींच आहे की नाही मी?'' मी अनवधानाने त्याला 'पाह्यलंस' म्हटलं होतं. तो एकदम गप्प झाला. मग काही वेळानंतर म्हणाला

-''न्यायाधीश कुठं आहेत?''

चकित होऊन मी पुटपुटले, -''मला नाही ठाऊक!''

-''न्या- या- धी- श?'' त्यानं पुन्हा विचारलं. माझ्या मन:चक्षूंपुढे काळा डगला परिधान केलेलं एक कडक व्यक्तिमत्त्व दिसू लागलं. सर्व सत्ताधारी- पण दुसऱ्याच्या भावनांची कदर न करणारं ? काय बरं अभिप्रेत असेल या पोराला? अशा एखाद्या न्यायाधीशासमोर हे पोर आणि मी अपराध्याच्या पिंजऱ्यात उभे आहोत असं चित्र नजरेसमोर तरळू लागलं-

छे छे -मी ठरवलं, हे बरोबर नाही-न्यायाधीशाचं सकारात्मक चित्रच आपण रेखाटायला हवं - प्रश्न विचायची संधी साधून मी म्हटलं-

-''तुझे बाबा न्यायाधीश आहेत?'' त्यानं नाही म्हणून मान हलवली

-''मग काय करतात तुझे आई-बाबा?''

उत्तर अगदीच अनपेक्षित होतं-

-''ते बडबड करतात!''

यावेळी मात्र माझ्या मनांतलं न्यायाधीशाचं चित्र बदललं, जरा सौम्य झालं.

मग परत एकदा त्याच्या बोलण्यात न्यायाधीश आले- तो म्हणाला -''काय करतात हो न्यायाधीश?'' मी गप्पच झाले. पण पोरानं मला यातनं सोडवलं. तो म्हणाला. -''न्याय देतात. हो ना?'' पण मग लगेच त्याला हवं होतं, न्याय देणं म्हणजे काय असतं ते.

-''एखादं कृत्य किंवा वक्तव्य, चांगलं की वाईट ते न्यायाधीश ठरवतात.'' मला वाटलं, काय फालतू स्पष्टीकरण देत आहे मी ! तो ऐकतोय् तरी की नाही कोण जाणे ! त्याने मात्र समजूतदारपणे माझी अपुरी स्पष्टीकरणं ऐकून घेतली होती. ती किती थिटी होती, हे मला जाणवत होतं.

थोड्या वेळानंतर तो हरवलेल्या आवाजांत म्हणाला-

-"आणि सत्य? ते काय असतं?"

ज्या स्वरांत त्यानं हा शब्द उच्चारला त्यावरून तो त्या अंतिम सत्याबद्दल बोलत असावासं वाटलं.

-"सत्य म्हणजे... अं... आपल्याला जे मनापासून वाटतं - तेच बोलणं, जे खरं वाटतं, तसंच वागणं म्हणजे सत्य..."

माझा खुलासा हास्यास्पद होता अगदीच! एक अंध, खऱ्यापेक्षा वेगळ्या तऱ्हेने वागेल तरी कशाला? त्याला मनातून जे वाटतं त्याहून निराळं तो बोलेल तरी कशासाठी? खोटेपणाने वागण्या-बोलण्याची कल्पना त्याला सुचणारही नाही. तशी गरजही त्याला पडणार नाही आणि तशी संधीही त्याच्या आयुष्यात येणार नाही! 'सत्या'चाही मग पार निकाल लागला....

आता तो स्वतःशीच कुजबुजत होता - "असत्य बोलणं... असत्य वागणं..." नकळत तो शब्दांशी खेळत होता. भले मोठे अजस्त्र शब्द माझ्यापुढे ठेवत होता- पण त्यांना स्पर्श करताच, ते शब्द फुटून जात होते.... विरून नाहीसे होत होते.... एकाएकी लक्षात येत होतं की ते पोकळ आहेत. नाटकांतल्या काल्पनिक राक्षसांसारखे तद्दन खोटे आहेत.

हे अंध पोर मात्र त्या शब्दांचा एकमेकांशी संबंध जोडत होतं. त्यांचा समन्वय लावायचा प्रयत्न करत होतं. एका शब्दामधून दुसरा शब्द निघत होता. 'न्यायाधीशा'तून 'सत्य' निघालं - 'सत्या'तून 'असत्य'. आता असत्यातून काय निघणार? एक गोष्ट प्रकर्षानं जाणवत होती. अंधांच्या मनोविश्वात लबाडीचा लवलेशही नव्हता कुठे. आपल्यापैकी प्रत्येकाच्या जीवनाचा लबाडी हा एक स्वाभाविक घटकच असतो. अगदी सुस्वभावी माणसंच काय पण लहान मुलंसुद्धा, कृत्रिम स्मित, खोटेपणाने जोडलेले हात या गोष्टी सहजी करीत असतात. त्या आधंळ्या पोराच्या जगांत यापैकी कशालाही जागा नव्हती - त्याच्या या निखळ निर्व्याजतेमुळेच मी त्याच्याकडे ओढली जात होते.

त्यानं मात्र आपल्या निष्ठुर प्रश्नांच्या फैरी झाडणं चालूच ठेवलं होतं -

"चर्चमध्ये काय करतात?"

"प्रार्थना करतात"

"हो खरंच की. प्रार्थना करतात." आणि लगेच त्यानं आपले हात जोडून डोक्यापर्यंत उंचावले.

''पवित्र मारियम कोण होती?''

''येशू बाळाची आई होती.''

''कोण होता येशू बाळ?''

''तुझ्यासारखाच मुलगा होता लहानसा. त्याचे बाबा सुतारकाम करायचे. लाकडाच्या वस्तू बनवायचे -''

''आणि मग?''

''मग तो मोठा झाला - आईवडिलांना सोडून.... घरापासून दूर निघाला....''

काही केल्या 'देव', 'परमेश्वर' हे शब्द मला उच्चारावेसेच वाटेनात. बाकीच्या सगळ्या शब्दांची झाली तीच गत याही शब्दांची होईल अशी भीती वाटत होती मला...

''आणि मग?''

मला उत्तर सुचेना. पुन्हा एकदा ते पोरच माझ्या मदतीला आलं आणि गोष्टीचा शेवट करीत म्हणालं -

''त्यानं जगाचा उद्धार केला!''

मी सुटकेचा निःश्वास टाकला तितक्यात तिकिट तपासनीस आले आणि म्हणाले,

''हां- इथं आहेस होय तू? हं, हे घ्या त्याचं तिकिट - जपून ठेवा मात्र नीट. ते त्याचं रिटर्न तिकिट आहे.''

त्यांनी माझ्या हातात एक घडी घातलेला कागद दिला. पोरानं तो स्वतःच्या हातांत घेतला. बोटांभोवती त्याची गुंडाळी केली, ती जवळ घेऊन चेहेऱ्यावरून फिरवली. तिचा वास घेतला. ती गालावर, ओठावर टेकवली.

अशा प्रकारचा स्पर्श मी कधी पाह्यला नव्हता. विलक्षण एकाग्रतेने तो ती वस्तू जाणून घेत होता. तिला आत्मसात करून टाकत होता. थोडा वेळ जाऊ दिल्यावर मी तो कागद त्याच्याकडून परत घेतला. सरळ करून उलगडला आणि त्यावरचं त्याचं नाव वाचलं. त्यानं मला आधी त्याचं नाव सांगितलं होतं, तेव्हा ते मला नीटसं समजलं नव्हतं. आता हेही कळलं की तो एका अंधाश्रमात राहात होता आणि सुट्टीला चालला होता. 'सुट्टी!' आणखी एक खरा अर्थ हरवून गेलेला फोल शब्द! मात्र 'गवत' हा शब्द ऐकल्याबरोबर त्याच्या चेहेऱ्यावर उमटलेले हरखले भाव मला आठवले.

त्याच्या तिकिटावर काय लिहिलंय ते त्याला माहीत करून घ्यायचं होतं, म्हणून मग मी त्याला सगळं वाचून दाखवलं. हा खेळ त्याला आवडला आणि त्यानं पुन्हापुन्हा माझ्याकडून ते वाचून घेतलं.





अनुक्रमणिका

त्याची थोडी करमणूक व्हावी म्हणून मी त्याच्या हातात एक छानशी सोनेरी पेन्सील दिली. त्याच्या लगेच लक्षात आलं की ही वस्तू पेन्सील आहे. तो मग लिहायचं म्हणू लागला तेव्हा माझ्या पिशवीतून एक जुनं पाकीट काढून त्याच्या मागची बाजू त्याला लिहायला दिली. कुणास ठाऊक कदाचित् त्याला काही अक्षरं येतही असतील लिहायला. पण नाही, त्यानं नुसत्याच गिचमिड रेघोट्या काढून कागद गिरगिटून टाकला. मात्र हे करताना तो त्या रेघोट्यांना वेगवेगळ्या गावांची नावं देत होता !

काही वेळापूर्वीपासून आमच्या मागच्या बाकावर बसलेले एक गृहस्थ आमचा खेळ न्याहाळत होते. त्यांनाही त्यात गंमत वाटू लागलेली दिसली. ते मला विचारून आपली चामड्याची बॅग घेऊन आमच्या समोरच्या बाकावर बसायला आले. चांगले रुबाबदार गृहस्थ होते ते. चेहरा तरुण पण केस मात्र पांढरेशुभ्र. त्या केसांच्या पांढरेपणामुळे त्यांचे काळे डोळे आणि त्यांची तांबूस रापलेली कांती उठून दिसत होती. त्यांनी या पोरावर प्रेमाचा वर्षाव सुरू केला. ते नुसते त्याच्याशी बोलूनच थांबले नाहीत तर त्याला मांडीवर घेऊन, त्याला घट्ट कवळून त्याला कुरवाळू लागले.

-''हे घे, माझ्या चेहेऱ्याला हात लाव, माझे खांदे पकड. हात लावून पहा-'' मुलानं विरोध केला नाही पण तो चांगलाच गोंधळून गेलेला दिसला. मीही चक्रावून गेले. अनोळखी प्रवाशाच्या या प्रेमातिरेकाने आता मला अवघडल्यासारखं वाटू लागलं. खरं तर थोडीशी काळजीही डोकावू लागली मनात.

तेवढ्यात स्टेशन दिसू लागलं आणि गाडीचा वेग मंदावला. अंध मुलाचा निरोप घ्यायची वेळ येऊन ठेपली. मी त्याचा कोट त्याला घातला, त्याचा लोकरी गळपट्टा त्याच्या मानेभोवती लपेटला, डोक्यावर त्याची टोपी ठीकठाक बसवली. डब्यात उकडत होतं म्हणून प्रवासाच्या सुरुवातीला त्याने हे सारं माझ्या मदतीनं उतरवून ठेवलं होतं.

कातडी बॅगवाल्या गृहस्थांच्या मदतीने मी त्याला डब्यातून खाली उतरवलं. आमच्या दोघांचा एकेक हात धरून तो उभा राह्यला. प्लॅटफॉर्मवर बरीच गर्दी होती. माझी नजर शोधत होती त्याचे आईवडील. मी आपली जाणाऱ्या-येणाऱ्याला म्हणत होते, ''हा आलाय् बरं का!'' सगळेजण विस्मयाने माझ्याकडे पाहत होते- पण पुढे मात्र कुणीच येईना. तिथं त्याची वाट पाहणारं कुणी नव्हतंच. आता त्याला स्टेशनमास्तरांच्या ताब्यात देणं भाग होतं-

-''तुझी आई सकाळीच येऊन गेली.'' ते म्हणाले. गाडी सुटायची वेळ झाली होती; मी घाईघाईने वळले आणि चटकन् डब्यात चढले. गाडी सुटता सुटता

मला एक झगमगीत काळे कपडे घातलेली, नि लालभडक ओठ रंगवलेली बाई प्लॅटफॉर्मवर येताना दिसली. तिनं वर्तमानपत्रविक्रेत्याजवळ चौकशी केली.

ती त्याची आई होती.

त्याच्याशी निरोपाचे दोन शब्दही न बोलता मी निघाले होते. निघाले होते माझ्या जगाकडे, त्याला त्याच्या जगात सोडून देऊन. पण ते पोर मला चटका लावून गेलं होतं. न्यायाधीश आणि सत्य याबद्दल बोलणारं, खाऊच्या गोळीला नाही म्हणणारं, कधीही न हसणारं, पण कधीच न रडणारं ! उत्सुकतेनं भरलेलं ते पोर... अंधाराच्या थडग्यांत जिवंतपणी गाडलेलं ते पोर आणि पुन्हापुन्हा 'आणि मग?' म्हणून विचारणारं ते पोर ....

*टीप :*

*कोरिना बियचा जन्म स्वित्झर्लंडच्या व्हाले या निसर्गरम्य परगण्यात १९१२ मध्ये झाला. स्वित्झर्लंडमध्ये फ्रेंच, जर्मन, इटालियन व रोमांश या चारही भाषांना अधिकृत स्थान आहे. कोरिना बियने फ्रेंच भाषेमधे विपुल लेखन केलेले आहे. तिच्या कादंबऱ्या व कथनात्मक लेख प्रकाशित झालेले आहेतच परंतु ती मुख्यत्वे प्रसिद्ध आहे, ती तिच्या लघुकथा लेखनामुळे. तिचे अनेक लघुकथा संग्रह गाजले आहेत. भाषेची सहज -सुंदरता आणि संवेदनक्षम मनाची तरलता हा तिच्या लिखाणाचा विशेष मानला जातो. तिच्या मृत्यूपूर्वी (१९७९) तिला फ्रान्समधील गोंकूर ( Goncourt) पुरस्कार १९७५ मध्ये मिळाला होता.*

□□□

**फ्रेंच भाषा विभाग, फर्गसन कॉलेज**

**पुणे- ४११ ००४.**

# मूर्तातून अमूर्त की अमूर्तातून मूर्त ?

**चिं. मो. पंडित**

* आकड्यांचा उदय हा गणनाच्या गरजेपोटी झाला. २ म्हणजे २ बकऱ्या, २ पेरू असे काहीतरी वस्तूंशी निगडीत असे पुढे आले. मात्र पुढे आकडे आणि + - x ÷ या खुणा यांना स्वतंत्र अस्तित्व आले. ते बकऱ्या आणि पेरू असण्याची गरज उरली नाही. आकडे आणि खुणा यांचा वस्तूंशी असलेला संबंध सुटला आणि त्यांचे अमूर्त खेळ सुरू झाले. त्यांचे स्वतंत्र नियम तयार झाले आणि त्यातून नवनवीन शोधही लागले. त्या अमूर्तातून जन्मलेल्या शोधांचे मूर्तात पडताळेही मिळायला लागले. असा विचारांचा वस्तुरूपतेकडून अमूर्ताकडे प्रवास सुरू झाला.

* संगीतात काय घडले? मुळात स्वर हे अमूर्तच, त्यांचा संबंध भावभावनांशी. आनंद, दु:ख, उदासपण, धीरगंभीरता असे अनेक भाव व्यक्त करणारे, मन:स्थिती दाखविणारे. पण इथे प्रवास उलटा दिसतोय. स्वरांना - अगदी शास्त्रीय संगीतातील स्वरांनाही बंदिशीतील शब्दांचा आधार का लागतो? गीतकाराला चाल आणि काव्याला गेयता (नाद + लय) का लागते? शब्दांचा आधार नसेल तर कंठसंगीत आणि वाद्यसंगीत सारखेच होतील? नुसते वाद्य एकसुरी वाटते पण वाद्यवृंदाचा कंटाळा येत नाही. फरक कंठ आणि वाद्य यांच्या स्वरनिर्मितीत आहे की शब्दांच्या आधारात?

लय ताल हे तर पूर्ण अमूर्त. धृपद धमार म्हणजे नुसता लयकारींचा चमत्कार? तराणा म्हणजे काय?

संगीतात form असा शब्द प्रयोग होतो. Pottery तल्या form, texture, colour यांच्याशी त्याची तुलना होईल? संगीतकार जेव्हा आपली कला सादर करतो तेव्हा अशा फॉर्मचा विचार होतो? या सर्वांतील आनंद मूर्ताचा की अमूर्ताचा? बंदिशीला स्वत:चा घाट असतो?

* त्यामानाने चित्रकलेतील अमूर्ताचा संदर्भ कळायला सोपा वाटतो. पाहिलेल्या किंवा जाणवलेल्या गोष्टींचा मनावर जो ठसा उमटतो त्याचा कागदावर / कॅनव्हासवर केलेला आविष्कार. आणि रंगांना तर आकार नसतोच. असते आभा आणि तीव्रता. रेषांना तरी कुठे आकार असतो? असते चाल आणि लय. अमूर्त आणि निराकार यात भेद काय?

* साहित्यात अमूर्त असते का? कुठे, केव्हा, कसे? आवश्यकता काय? हुरहूर? साहित्य तर अमूर्ताला, अगोचराला, अबोधाला शब्दरूप (मूर्तस्वरूप) देते.

केव्हातरी ध्वनींच्या समूहाला शब्दांचे आणि त्या शब्दांच्या खुणांना अर्थाचे स्वरूप आले. हे शब्द वस्तु-निर्देशक, वर्णन-निर्देशक किंवा भाव (विचार) निर्देशक होते.

त्यातूनच आजची भाषा निर्माण झाली. जाणिवा, अनुभव जितके चौफेर तितकी भाषा समृद्ध.

आजही ध्वनी - शब्द - अर्थ ही प्रक्रिया चालू आहे की आता फक्त असलेल्या शब्दांच्याच जुळण्या, मांडण्या उलटसुलट करत नवीन शब्द तयार होतात? मूळ शब्द, भाषेचे Building Blocks कोणते? त्यांची संख्यात्मक वाढ कशी मोजतात? अनुभूतीच्या आणि अनुभवांच्या आविष्कारासाठी नवनवे शब्द लागतातच. दरवर्षी मराठीत अशा किती पायाभूत शब्दांची भर पडते? की ध्वनी- शब्द -अर्थ ही प्रक्रिया आता बंद पडलीय?

इंग्रजी थिझॉरसमध्ये शब्द सहा गटांखाली दिलेले आहेत -

1. Abstract relations 2. Space 3. Matter 4. Intellect
5. Volition आणि 6. Emotion, Religion and Morality.

उघडच आहे की शब्दनिर्मितीची प्रक्रिया वरच्या अतिसुलभीकरणात बसणार नाही. विज्ञानामुळे शब्दसंपत्तीत भर पडली ती बहुतांश २) आणि ३) मधे असावी, उत्पादन, व्यापार, बाजारपेठा यांमुळेही शब्दात भर पडली आहेच. १), ४), ५), ६) यात भर कशी पडत गेली? क्रियापदे कशी तयार झाली?

अशा या गोष्टींचा उलगडा झाल्याशिवाय ''मराठीला वाचवा, मराठी मरू घातलीय....'' वगैरे काही कळणार नाही. ते निरर्थकच आहे. मराठी या शब्दांनी भौगोलिक अर्थ कळला तरी सांस्कृतिक, ऐतिहासिक या गोष्टी काळाच्या ओघात नामशेष होऊ शकतात?

✻ विचारांना-विचार करण्यासाठी - शब्दांचा, मूर्तांचा आधार लागतो का? की विचार स्वतंत्रपणे उद्भवतात आणि शब्दांतून, मूर्तांतून प्रकट होतात? मूकबधिर विचार करीत नाहीत असे कसे म्हणता येईल? म्हणजे मूळ प्रश्न हा अनुभव आणि अनुभूती यांचा नसून त्यांच्या आविष्काराचा, ते दुसऱ्यांपर्यंत पोहोचविण्याचा आहे.

✻ आणिक दोन गोष्टींचा आपल्या विचारांवर पगडा आहे.

निसर्गात आकृतिबंध (patterns) आहेत. झाडांची वाढ, स्फटिकांची घडण... इ. मधून ते दिसतात. त्यामुळे series, vectors.... वगैरेंचा अभ्यास अर्थपूर्ण होतो. मूळ आकृतिबंध कळला की ''पुढे काय?'' याचे अंदाज बांधता येतात, (growth patterns, behavioural patterns, seasonal patterns....)

निसर्गात नुसत्या घटना (stray incidences) नसतात. घटनाक्रम, घटनाचक्र असतात. तुटक तुटकपणा, सुटेसुटेपणा नसतो. अखंड प्रक्रिया चालू असतात. त्यामुळेही आपण संभाव्यता, एक परिपूर्ण व्यवस्था (a self sustained system) यांचा शोध घेऊ शकतो.

□□□

**६, सुरुची, संत जनाबाई पथ**
**विलेपार्ले पूर्व, मुंबई - ४०० ०५७**

# पुश्किन : 'सर्व प्रारंभांचा प्रारंभ'

पंडित आवळीकर

*परस्परपरिचय आणि आदानप्रदान यांतून भाषा आणि साहित्य जोम धरत असतात. म्हणून गालिब पाठोपाठ पुश्किनच्या साहित्य थोरवीचं हे स्मरण. (पहा : गालिब, भाषा आणि जीवन १६:३ पावसाळा १९९८)*

*रशियन साहित्यिक अलेक्सांद्र पुश्किन याच्या जन्माला या वर्षी दोनशे वर्षं पूर्ण होत आहेत. त्या निमित्तानं, रशियन भाषा -साहित्याचे जाणकार अभ्यासक पंडित आवळीकर यांनी लिहिलेला हा लेख.* संपादक

अलेक्सांद्र पुश्किन (१७९९-१८३७) हा आधुनिक रशियन वाङ्‌मयाचा आणि भाषेचा जनक आहे. माक्सिम गोर्कीनं त्याला 'सर्व प्रारंभांचा प्रारंभ म्हटलं. 'The beginning of all beginnings' ही अत्युक्ती नव्हे. पुश्किन हा रशियन वाङ्‌मय सृष्टीतील 'अदाम' (Adam) आहे असं अनातोली लुनाचार्स्कीनं आवर्जून सांगितलं. आपल्या भाषेत सांगायचं तर आधुनिक रशियन वाङ्‌मय ही गंगा असेल, तर पुश्किनचं वाङ्‌मय ही 'गंगोत्री' आहे. वोल्गा असेल तर 'वोल्गोत्री' आहे. विशेषतः त्याचं गद्य.

पुश्किनपूर्वी रशियनमध्ये गद्यवाङ्‌मय जवळजवळ नव्हतंच. होतं, नाही असं नाही. अलेक्सांद्र-मार्लिन्स्की (१७९७-१८३७) याच्या 'बिवुआकमधली संध्याकाळ' या कादंबरीचा आणि निकोलाय करमाझिन (१७६६-१८२६) याच्या 'नताल्या बर्यार्स्काया दोच' या गोष्टीचा संदर्भ पुश्किननं आपल्या गोष्टींत दिला आहे.

तसंच अलेक्सांद्र पित्रोविच सुमरोकव (१७१८-७७) आणि मिखाईल खिरास्कव (१७३३-१८०७) यांचे उल्लेख व संदर्भ पुश्किननं आपल्या 'कॅप्टनची मुलगी' मध्ये दिले आहेत. तरीही त्याच्यापूर्वीचा लक्षणीय गद्यग्रंथ म्हणून त्यानं नाव घेतलं ते 'रशियन राज्याचा इतिहास' ('इस्तोरिया गसुदार्स्त्व रस्सीयस्कव') ह्या करमाझिनच्या कृतीचं.

पुश्किनच्या 'यिव्गेनी अनेगिन' मधल्या नायिकेला-तत्यानाला-रशियनमध्ये प्रेमपत्र लिहिता आलं नाही. तिला फ्रेंचचा आश्रय घ्यावा लागला. तिला दोन अडचणी होत्या. एक : तिला रशियन तितकंसं चांगलं येत नव्हतं. दोन : रशियन भाषा पत्रात्मक गद्याला (Epistolary Prose) सरावलेली नव्हती. आपल्या भाषेत प्रेम व्यक्त करता येऊ नये ही तत्कालीन रशियन भाषकांची आणि भाषेची केवढी केविलवाणी अवस्था

होती! पुश्किननं ही दुरवस्था दूर केली हे त्याचं महत्त्वाचं भाषाविषयक कर्तृत्व होय.

पुश्किननं काव्यासाठी काय केलं या पेक्षा गद्यासाठी काय केलं हे पाहणं आणि जे केलं त्याचं महत्त्व जाणणं अटळ आहे. 'थोर प्योत्रचा निग्रो' (१८२७) ही त्याची अपूर्ण दीर्घकथा म्हणजे त्याच्या गद्य लेखनाची सुरुवात. आईकडून पणजोबा असलेल्या इब्राहिम हन्निबाल याची कथा एका अर्थानं पुश्किनच्या आत्मकथेची ऐतिहासिक पार्श्वभूमी असावी हेही अर्थपूर्ण आहे.

याच सुमारास गोगोलसारखा गद्यलेखक पुढं येऊ लागला होता. पुश्किनच्या प्रभावाखालीही येत चालला होता. याच काळात एकदा पुश्किनला भेटायला गोगोल आला. अगदी शाळकरी भक्तिभावानं. मध्यरात्र झाली होती. नोकरानं आपला धनी विश्रांती घेत आहे असं गोगोलला सांगितलं. गोगोलनं विचारलं : ''तो रात्रभर काम करतो हे खरं काय?'' 'काम करतो' - म्हणजे तुम्हांला काय म्हणायचं आहे?'' नोकरानं गोगोलला प्रश्न विचारला आणि पुढं सांगितलं : ''तो पत्ते खेळत असतो!'' या पत्त्यांनीच 'इस्पिकची राणी' (पीकावाया दामा १८३३) ही श्रेष्ठ कथा रशियनलाच नव्हे, तर जागतिक वाङ्मयाला मौलिक देणगी म्हणून दिली.

दस्तोयेव्स्कीच्या 'गुन्हा आणि शिक्षा' ('प्रेस्तुप्लेनिये इ नकाझानिये') या कादंबरीच्या कथानकात - 'इस्पिकच्या राणी'चे पडसाद ऐकू येतात. पुश्किनचा हर्मान आणि दस्तोयेवस्कीचा रास्कोल्निकोव हे दोघंही श्रीमंत होण्याच्या स्वप्नानं - एका विकृतीनं; - पछाडलेले आहेत. रास्कोल्निकोवची विकृती अनेक मानसशास्त्रीय कारणांनी निपजलेली असली तरी त्या व्यक्तिरेखेच्या मुळाशी कुठंतरी हर्मान आहे. हर्मान बेत फसल्यानं वेडा झाला. एवढं दाखवून पुश्किन थांबतो. परंतु दस्तोयेव्स्की त्याच्याही पुढं जाऊन, रास्कोल्निकोवला वेगळं परिमाण प्राप्त करून देतो. रास्कोल्निकोव बेत यशस्वी झाल्याच्या वेदनेत जळत राहतो. त्याची निराशा हा माणुसकीचा विजय आहे. अंधाऱ्या परिस्थितीनं झाकळलेल्या आत्म्याचा शोध आहे. 'इस्पिकच्या राणी'नं दस्तोयेवस्कीसारख्या प्रतिभावंताला झपाटून टाकणं हे देखील पुश्किनच्या या कथेचं - त्याच्या गद्याचं; फार मोठं यश आहे. 'पोष्टमास्तर' या पुश्किनच्या कथेला आपलंच हृद्गत मानणारा मकार देवुश्किन हा दस्तोयेव्स्कीच्या 'गरीब लोक' ('बेद्निये ल्यूदी') या कादंबरीचा नायक आहे.

'कॅप्टनची मुलगी' ('कपितान्स्काया दोच्का' १८३६) हे तर पुश्किनच्या गद्यलेखनातील शिखर आहे आणि पुढील श्रेष्ठ कादंबऱ्यांचं प्रसादचिन्ह आहे. तिच्यात तालस्तोयच्या 'युद्ध आणि शांतता' या कादंबरीचे काही गुण असल्याचं अव्राहम





अनुक्रमणिका

यर्मोलिन्स्कीनं नोंदवलं आहे. खरं तर, हे विधान उलटं पाहिजे. 'कॅप्टनची मुलगी या कादंबरीचे काही गुण 'युद्ध आणि शांतता' मध्ये आहेत. 'परिपूर्ण अभिव्यक्तीचा चमत्कार' या नेमक्या शब्दांत विस्सारिओन बेलिन्स्कीनं 'कॅप्टनची मुलगी' या कृतीचा यथार्थ गौरव केला आहे.

'बेल्किनच्या गोष्टी' किंवा 'कॅप्टनची मुलगी' ही मुळात दुसऱ्या कोणाची तरी हस्तलिखितं आहेत; असा आभास पुश्किननं निर्माण केला. इवान पित्रोविच बेल्किन आणि प्योत्र अंद्रेइच ग्रिन्योव या काल्पनिक व्यक्ती त्यानं जन्माला घातल्या. आणि या त्यांच्या अनुक्रमे 'गोष्टी' आणि 'आठवणी' आहेत अशी चलाखी **(device)** त्यानं योजली. सेन्सॉरला चकवण्यासाठीही असेल. आपल्याकडं वामन मल्हार जोशी यांनी 'आश्रमहरिणी' बाबत अशीच काल्पनिक 'पोथी'ची युक्ती वापरली होती. याची गंमत वाटते. निवेदनाबाबत काही गोष्टी नोंदवाव्याशा वाटतात. आपल्याकडल्या हरिभाऊंप्रमाणं 'वाचकहो!' अशी उघड आरोळी पुश्किन मारीत नाही. पण गोष्ट सांगताना त्याला वाचकाचं भान असतं. ''गोष्टीच्या अखेरीचं आता काय वर्णन करायचं? या बेकार कामापासून वाचक माझी सुटका करतील अशी आशा आहे.'' असं पुश्किन म्हणतो. कथा-कादंबरीचं अकृत्रिम तंत्र तो जाणतो. त्या तंत्राचा बडिवार माजवत नाही. कथेच्या वा प्रकरणाच्या शेवटी येणारी कलाटणी अत्यंत स्वाभाविक अशी अखेर असते. 'नेम' किंवा 'हिमवादळ' या कथा ओ हेन्री किंवा मोपांसा यांची आठवण करून देतात. 'कॅप्टनची मुलगी' मधील जवळजवळ प्रत्येक प्रकरण याच जातीच्या कथेसारखं वाटतं आणि पुश्किनचं गद्य किती शक्यता किंवा संभाव्यता आपल्यात सामावून घेणारं होतं याचं सुखद सूचन करतं. कादंबरीत प्रत्येक प्रकरणावर - शीर्षकाच्या जोडीला; काही ना काही एखादा पद्यांश अथवा गद्यांश, देऊन प्रकरणातील आशयाची सूचना द्यायची पद्धत पुश्किन वापरतो. आपल्याकडे हळबेशास्त्र्यांनी 'मुक्तामाले' मध्ये हेच केलं आहे. समर्थपणानं - ते पद्यांश वा गद्यांश उपरे वाटणार नाहीत याची काळजी दोघांनीही घेतली आहे.

पुश्किनचं गद्यलेखन काव्याप्रमाणंच महत्त्वाचं आहे. त्याला प्रारंभ करताना 'वर्षं रूक्ष गद्याकडं आहेत वळत' असं त्यानं 'यिव्गोनी अनेगिन'मध्ये - काव्यातचं; म्हटलं. खट्याळ पण यमकबाज अशा मंदगामिनी कवितेमागं आपण फरफटत जात आहोत आणि लौकरच शालीन गद्याच्या पातळीपर्यंत घरंगळणार आहोत, असं स्वतःचं भविष्यही त्यानं वर्तवलं. पण ते खोटं ठरलं. 'कॅप्टनची मुलगी' हे त्याचं सर्वोत्कृष्ट गद्य-श्रेष्ठ काव्य ठरलं. मृत्यूपूर्वीचं त्याचं 'हंसगीत' ठरलं. याचं कारण काव्य त्याच्या

रोमारोमांत भिनलेलं होतं. 'तो सांगत नाही; तो गातो' ('ओन निरस्काझायोत; ओन् पायोत्') हे एस्. बोन्दी या त्याच्या ज्येष्ठ टीकाकाराचं विधान, पुश्किनच्या काव्याप्रमाणंच गद्यालाही लागू पडतं. त्याच्या गद्याचं मोठेपणही त्यातून ध्यानी येतं.

□□□

**मराठी विभाग, गुलबर्गा विद्यापीठ,**
**गुलबर्गा- ५८५१०६.**

---

## भूतदयेचा परिणाम

**सुधीर थत्ते**

प्राण्यांच्या संदर्भात दाखवलेल्या भूतदयेचा परिणाम माणसावर वेगळाच होऊ शकतो याचा काही वेळा गमतीदार अनुभव येतो. एकदा एका शेतकऱ्याने अपघातात त्याला झालेल्या शारीरिक दुखापतीबद्दल नुकसानभरपाई मिळावी म्हणून अमेरिकेतल्या टेक्सासमधल्या ह्युस्टन येथील न्यायालयात खटला भरला होता. त्या वेळी बचाव पक्षाचा वकील आणि तो शेतकरी यांच्यात प्रत्यक्षात झालेला संवाद.

वकील : अपघातानंतर त्या ठिकाणी पोलिस आला, तेव्हा तुम्ही त्याला सांगितलंत की, आता माझी तब्येत जेवढी ठणठणीत आहे तेवढी ठणठणीत ती उभ्या आयुष्यात कधी नव्हती, हे खरं आहे का?

शेतकरी : हो अगदी खरं आहे.

वकील : असं जर आहे, तर मग माझ्या अशिलाच्या मोटारीची तुमच्या घोडागाडीशी टक्कर झाल्यामुळे तुम्हाला जबर शारीरिक दुखापत झाली, असा दावा तुम्ही आता कसा काय करता आहात?

शेतकरी : अपघाताच्या ठिकाणी तो पोलिस आला तेव्हा त्याने जवळ जाऊन माझ्या घोड्याची स्थिती पाहिली. त्याचे पाय निकामी झाले होते आणि असह्य वेदनांनी तो ओरडत होता. भूतदयेने पोलिसाने त्याच्या डोक्यात गोळी घातली आणि त्याची सुटका केली. त्यानंतर त्या पोलिसाने रोव्हरची म्हणजे माझ्या कुत्र्याची स्थिती पाहिली. त्यालाही प्रचंड दुखापत झाल्याने तोही विव्हळत होता. त्याच्या त्या विव्हळण्याने दया येऊन पोलिसाने त्याच्याही डोक्यात गोळी घातली. मग पोलिस माझ्याकडे वळाला आणि त्याने मला विचारले, "तुमची तब्येत कशी आहे?" अगोदरच्या दोन प्राण्यांबाबतचा अनुभव लक्षात घेऊन काय सांगणं योग्य होईल याचा मी पटकन विचार केला आणि त्या पोलिसाला सांगितले, की "आता माझी तब्येत जेवढी ठणठणीत आहे तेवढी ठणठणीत ती उभ्या आयुष्यात कधी नव्हती."

□□□

**सकाळ (पुणे) १५ मे १९९९ पुरवणी**
**वन्य प्राणी संवर्धनाचा आर्थिक मार्ग**

# गणिताची भाषा
## (लेखांक २)

**मनोहर राईलकर**

### गणिताच्या भाषेची वैशिष्ट्यं

(१) एक आणि एकच

इथं दोन शब्दांचा उल्लेख आहे. (१), एक (२) एकचं. एरवीच्या भाषेमध्ये ह्या दोन शब्दांच्या अर्थात फारसा फरक पडत नाही. असलाच तर छटेचा फरक असेल. पुढील वाक्यं पहा...

(१) बाबुरावांना **एक** मुलगा आहे.

(२) बाबुरावांना **एकच** मुलगा आहे.

पण, गणिताबाहेरील व्यक्तींना विचित्र वाटतील असे काही वेगळे अर्थ ह्या दोन शब्दांना गणितात आहेत. एरवीच्या भाषेत पहिल्या वाक्यातल्या 'एक' मध्ये 'एकच' ही छटाही असतेच. निराळ्या शब्दांत, बाबुरावांना एकच मुलगा आहे, एकाहून अधिक मुलं नाहीत, असंही पहिल्या वाक्यात ध्वनित आहेच. कदाचित, बाबुरावांना मुलं आहेत की नाही, ह्या शंकेचं निरसन करण्याचा सांगणाऱ्याचा उद्देश असण्याची शक्यता आहे.

आणि दुसऱ्या वाक्यातल्या 'एकच' मध्येही 'एक' म्हणजे **निदान** एक मुलगा आहे, हा अर्थ अनुस्यूत आहे. 'बाबुरावांना एक मुलगा आहे', ही माहिती ऐकणाऱ्याला आधीच असण्याची शक्यता गृहीत धरून सांगणारा त्यांना 'अधिक मुलं नाहीत,' हे ठासून सांगत असण्याची शक्यता आहे. ह्या दोहोंत फरक असलाच तर तो केवळ संदर्भातून निर्माण होणाऱ्या अर्थच्छटेचा आहे.

म्हणजे या दोन विधानांपैकी कोणत्याही एका विधानात दुसरं विधान अनुस्यूत होत असल्याचं निदान आपण व्यवहारात तरी करू शकतो. सामान्य भाषेत बोलायचं तर ही विधानं समानार्थी आहेत, असं म्हणता येईल.

गोलावरील भूमितीबद्दल बोलताना आपण म्हटल्याचं आठवत असेल, की दोन भिन्न बिंदूंना जोडणारी एक रेषा असते. पण एकच रेषा असते, असं म्हणणं बरोबर ठरणार नाही. त्याचं कारणही आपण सांगितलं की, उत्तर आणि दक्षिण ध्रुवांना जोडण्याचं काम सर्वच रेखांश करतात.

इतक्यानं उलगडा होणार नाही, याची मला कल्पना आहे. म्हणून विरोधी उदाहरणं (counter example) देणं जरुरीचं आहे. हा प्रकार गणितात अनेकदा करावा लागतो. बहुधा विरोधी उदाहरणांशिवाय मूळ कल्पनेचा उलगडा लवकर होत





अनुक्रमणिका

नाही, असा गणित-शिक्षकांचा अनुभव आहे.

आपण फक्त प्रतलीय (plane) भूमितीचाच विचार करू. म्हणजे कोणत्या तरी एकाच प्रतलातील बिंदू, रेषा, आकृती यांच्यापुरताच विचार सीमित ठेवू. आता पुढील प्रमेय पाहा... (प्रतल ही संज्ञासुद्धा अव्याख्यातच आहे ! समजुतीकरता काही वेळा प्रतल पाण्याच्या पृष्ठभागासारख्या सपाट असतो असं सांगितलं जातं. पण पाण्याचा पृष्ठभाग सपाट कुठं असतो? तो तर गोलाच्या पृष्ठभागाप्रमाणंच असतो!)

*एका प्रतलात दोन बिंदू घेतले तर त्यातून जाणारं एक (तरी) वर्तुळ असतं.*




आकृतीतल्या क आणि ख बिंदूंतून पाहिजे तेवढी वर्तुळं काढता येतील. इथं दोन काढून दाखवली आहेत.

इथं मी कंसात 'तरी' असा शब्द घातला आहे. त्याचं प्रयोजन गणितात नाही. गणितात 'एक' चा अर्थ एक तरी, किंवा किमान एक असाच मानला जातो. पण गणिताबाहेरील व्यक्तींपुढं माझं म्हणणं स्पष्ट करायचं असल्यानं सामान्य भाषेच्या ह्या वैशिष्ट्याचा आधार घेणं भाग आहे. गणित्यांच्या दृष्टीनं एक म्हणजे किमान एक, किंवा एक तरी. अधिक असण्याच्या पर्यायाला त्यांची हरकत नसते! गोलावरील कोणत्याही दोन बिंदूंना जोडणारी एक रेषा असते, हे याचं चांगलं उदाहरण आहे. (पुढं अर्थच्छटांविषयी विवेचन केलं आहे, तेही पाहावं.)

याउलट, पुढचं प्रमेय पहा...

*जर (प्रतलात) चार भिन्न बिंदू असतील तर त्यांच्यातून जाणारं एकच (जास्तीत जास्त) वर्तुळ असतं.*

इथंही मी कंसात जास्तीत जास्त असे शब्द घातले आहेत. तेही भर किंवा जोर देण्याकरता, माझं म्हणणं अधिक स्पष्ट करण्याकरता. गणितात त्यांची गरज नसते. गणिती जेव्हा 'एकच' असं म्हणतो तेव्हा त्याला जास्तीत जास्त एक, किंवा कमाल एक, असंच सुचवायचं असतं आणि त्याच्या त्या म्हणण्यात, 'एकही वर्तुळ नसणं' हे किंवा अगदी गणिती भाषा वापरायची तर 'शून्य वर्तुळं असणं' ह्या पर्यायाला त्यांची हरकत नसते! कारण चार बिंदू एकचक्रीय (concyclic) नसतील तर असं वर्तुळ असू शकत नाही. खरं तर ज्या चार (कितीही) बिंदूंतून एक (तरी) वर्तुळ

जाऊ शकतं, त्या बिंदूंनाच 'एकचक्रीय बिंदू' म्हणतात. (व्याख्या!) तेव्हा चार भिन्न बिंदू दिले असता त्यांच्यातून एकच (जास्तीत जास्त) वर्तुळ जातं असं म्हणण्यात (कदाचित) असं एकही वर्तुळ जात नसेल, आणि (यदाकदाचित) जात असलंच तर एकच असतं, अधिक असू शकत नाहीत, हेच गणित्यांना अपेक्षित असतं.




आकृतीतील घ बिंदू वर्तुळावर राहू शकत नाही. काही चिकित्सक वाचकांच्या मनात असं येऊ शकेल की हे नसेल पण दुसरं एखादं असं वर्तुळ नसेल कशावरून? तसं वर्तुळ असू शकत नाही याचं प्रमाण पुढच्या प्रमेयावरून मिळतं, हे एक! आणि आपण भूमितीतल्या प्रमेयांची सिद्धता देण्याबाबत बोलत नाही, हे दुसरं. असो. (एवढ्यापुरता वाचकांनी माझ्यावर विश्वास ठेवावा.)

जेव्हा कुणी या परिच्छेदामधलं पहिलं वाक्य उच्चारतो, म्हणजे 'बाबुरावांना एक मुलगा', आहे असं म्हणतो. तेव्हा 'त्यांना एक तरी मुलगा आहेच, पण कुणास ठाऊक आणखीही असतील,' असं काही तो नक्कीच सुचवीत नसतो!

आणि वरच्यांपैकी दुसरं वाक्य म्हणजे 'बाबुरावांना एकच मुलगा आहे,' हे कुणी जेव्हा उच्चारतो तेव्हा बाबुरावांना (निदान) एक मुलगा असणं अपेक्षित असतंच. पण 'बाबुरावांना मुलगा नसेलही बरं का! पण असलाच तर एकच आहे!' असंही तो नक्कीच सुचवू इच्छीत नसतो!

तेव्हा **'एक' चा अर्थ किमान एक** आणि **'एकच' चा अर्थ कमाल एक** असा करण्याचा गणितात जागतिक आणि विशिष्टभाषानिरपेक्ष संकेत आहे.

सारांश, व्यवहारात जसे एक आणि एकच ह्यांचे अर्थ समान असतात, तसे गणितात नसतात. म्हणजे हे शब्द गणितात समान अर्थ घेऊन वावरत नाहीत. काही एका दृष्टीनं उलटच अर्थ घेऊन वावरतात, असं म्हणायला हवं.

पुढचं प्रमेय पहा...

(एकाच रेषेत नसलेल्या) तीन बिंदूंतून एक आणि एकच वर्तुळ जातं.

ह्या प्रमेयात खरं तर दोन प्रमेयं दडून बसलेली आहेत. ती अशी...

(अ) (एकाच रेषेत नसलेल्या) तीन बिंदूंतून एक (किमान एक) वर्तुळ जातं.

(आ) (एकाच रेषेत नसलेल्या) तीन बिंदूंतून एकच (कमाल एक) वर्तुळ जातं.

केवळ (अ) प्रमेयाचाच स्वतंत्रपणे समाचार घेतला तर 'अधिकही वर्तुळं जात असतील, ह्या पर्यायाला छुपा अवसर आहे. केवळ पहिलंच प्रमेय वाचलं तर आम्ही म्हणू, अधिक आहेत की नाही, आम्हाला माहीत नाही. असतीलही. कारण 'एक' याचा गणिती अर्थ 'किमान एक' असा असतो. तशी परिस्थिती दोन बिंदू दिले असताना असू शकते हे आपण पाहिलं आहेच. (तीन बिंदूंच्या बाबतीत, तसं असू शकत नाही, याची ग्वाही प्रमेयाच्या (आ) भागावरून मिळते, ही बाब वेगळी.)

दुसरीकडे, केवळ (आ) प्रमेयाचाच विचार केला तर, 'एकही वर्तुळ नसणं' ह्या पर्यायाला छुपा अवसर दिला असल्याचं जाणवेल. कारण 'एकच' याचा गणिती अर्थ 'कमाल एक' असा असतो आणि चार बिंदूंच्या बाबतीत तसं असल्याचं आपण पाहिलं आहे. (तीन बिंदूंच्या बाबतीत प्रत्यक्षात तसं असणार नाही, याची ग्वाही प्रमेयाच्या (अ) भागावरून मिळतेच.)

'एक आणि एकच' ह्या वाक्यांशाकरता गणिती 'नेमके एक' असाही वाक्प्रयोग करतात, हेही लक्षात ठेवण्यासारखं आहे.

आणखी एक उदाहरण पाहू.

मागं आपण युक्लिडच्या पाचव्या गृहीतकाचा उल्लेख केला होता. आता तिकडे वळू. ते गृहीतक असं होतं... एका रेषेला तिच्या बाहेरील बिंदूतून काढलेली आणि तिला न मिळणारी अशी एक आणि एकच रेषा असते. (पॅरललला आपण मराठी समांतर म्हणतो. पण हे पॅरललचं अचूक भाषांतर नव्हे. पॅरलल म्हणजे एकमेकांच्या शेजारून परस्परांना न मिळता जाणाऱ्या. अंतर 'सम' राह्यलाच पाहिजे असे पॅरललमध्ये अपेक्षित नाही. ते कमी जास्त होण्याला हरकत नसते. कारण तिथं अंतराचा संबंधच नसतो. पण शालेय गणितात केवळ युक्लिडीय भूमितीचाच विचार होत असल्यानं तेवढ्यापुरतं पॅरललचं 'समांतर' हे भाषांतर चालण्यासारखं आहे. जाता जाता, पॅरलल = समांतर हाही एक गैरसमजच होय!)

इथं आपण एक आणि एकच असा उल्लेख केला आहे, हे लक्षात घ्या. म्हणजे अशी 'एक' (तरी) रेषा असतेच हे एक आणि (जास्तीत जास्त) 'एकच' रेषा असते, हे दुसरं, ही दोन्ही (प्रकारची) विधानं अंतर्भूत आहेत. (युक्लिडनं स्वत: मांडलेलं रूप काहीसं निराळं होतं. पण हे रूप सहज कळण्यासारखं आहे.)

युक्लिड ज्या राजाच्या (पहिला टॉलेमी) काळात जन्मला त्याला हे विधान प्रमेयासारखं आहे, असं वाटून त्यानं ते सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. पुढं त्याच्यानंतर हे विधान सिद्ध करण्याची धडपड करणारे कित्येक गणिती होऊन गेले. गंमत अशी

की, नंतर येणाऱ्या गणित्यानं मागच्याची सिद्धता कशी चुकीची होती असं दाखवून स्वत:ची (पण चुकीचीच) सिद्धता दिली. पुढं गेरोलामो साशेरी नावाच्या इटालीय पाद्र्यानं क्रमविरुद्ध सिद्धतेचा प्रकार वापरून युक्लिडच्या पाचव्या गृहीतकाच्या विरुद्ध विधानं मांडून ती (विरुद्ध विधानं) चुकीची आहेत हे दाखवण्याचा प्रयत्न केला. 'त्यात आपल्याला यश आलं म्हणजे आपण युक्लिडचं गृहीतक सिद्ध केलं अशा आशेनं त्यानं आरंभ केला. त्यानं पुढील तीन पर्याय मांडले.

(अ) अशी एकही रेषा नसते.

(आ) अशा अनेक रेषा असतात.

(इ) नेमकी एक रेषा असते. (म्हणजे 'एक आणि एकच')

(त्याचे पर्याय काहीसे वेगळे होते. पण हे सहज लक्षात येण्याजोगे आहेत. पुढं आपण विरुद्धार्थी विधानांचा विचार करणार आहोतच. तूर्त इथलं (अ) हे विधान 'एक तरी रेषा असते' ह्या विधानांच्या विरुद्ध आहे; आणि (आ) हे विधान 'एकच रेषा असते' ह्या विरुद्ध आहे; ह्या दोन्ही बाबी लक्षात घ्याव्यात. माझं हे म्हणणं माणसाच्या तर्कबुद्धीला पटण्यासारखं आहे.)

यापेक्षा वेगळा प्रकार संभवत नाही, हे उघड आहे. त्यामुळं इथं पहिली दोन विधानं मिळून तिसऱ्या विधानाच्या विरुद्ध ठरतात, हेही मनुष्याच्या तर्कबुद्धीला पटण्यासारखं आहे. पहिले दोन पर्याय चुकीचे आहेत असं सिद्ध केलं की उरणारा तिसरा पर्याय 'सिद्ध' झालाच, असं वाटून जेव्हा त्यानं खटपट सुरू केली तेव्हा त्याला हे प्रकरण काही वेगळंच आहे. याची जाणीव होऊ लागली. पण त्याचा स्पष्ट उलगडा होण्यापूर्वीच त्याची इहलोकीची यात्रा आटोपली.

गणितात आपल्याला शिरायचं नसल्यामुळं या विषयावरची चर्चा वाढवीत नाही. आपल्या विषयाच्या दृष्टीनं आवश्यक असा मुद्दा तेवढा मांडतो. त्या काळापुरती गणिताची जेवढी प्रगती झाली होती, तिच्या आधारावर पहिला पर्याय अशक्य असल्याचं त्यानं दाखवलं. (वास्तविक त्याची सिद्धता चुकीची होती, किंवा अधिक अचूक बोलायचं तर, त्याची काही गृहीतकं बरोबर नव्हती.) दुसरा पर्याय अशक्य असल्याचं दाखवण्याकरता तो (पर्याय) सत्य असल्याचं गृहीत धरण्यानं विसंगती निर्माण होते, असं दाखवायचं त्यानं ठरवलं. (क्रमविरुद्ध सिद्धता) आणि मूळच्या गृहीतकाऐवजी 'एखाद्या रेषेला तिच्या बाहेरील बिंदूतून जाणाऱ्या आणि तिला न मिळणाऱ्या अनेक रेषा असतात' असं नवीनच गृहीतक त्यानं स्वीकारलं आणि चमत्कार असा की, त्यातून त्याला निराळीच भूमिती सापडली. फक्त आपल्याला हा एक विलक्षण शोध

लागला आहे, ह्याची स्पष्ट जाणीव होण्यापूर्वीच त्याची इहलोकीची यात्रा आटोपली आणि ह्या शोधाचं श्रेय दुर्दैवानं त्याला मिळालं नाही. हे काम पुढं रशियन गणिती इवान लोबॅशेव्स्की यानं आणि त्याच्यानंतर येणाऱ्या गणित्यांनी केलं. जाता जाता सांगण्यासारखी माहिती म्हणजे आइन्स्टाइनला आपला सापेक्षता सिद्धांत मांडण्याकरता ह्या प्रकारच्या वेगळ्या (म्हणजे न-युक्लिडीय) भूमित्यांचाच आधार घ्यावा लागला.

निराळ्या शब्दांत, युक्लिडची पहिली चार गृहीतकं तशीच ठेवून पाचव्या गृहीतकात वरीलप्रमाणं बदल करता येतो, असं म्हणू. गृहीतकं बदलण्यानं गणिताच्या नवीन शाखा मिळतात, असं एकदा ध्यानात आल्यावर गणित्यांनी सर्वच गृहीतकांवर हल्ला चढवला आणि गृहीतकांत बदल केले.

सारांश, गणिती कोणतीही विधानं गृहीतकं म्हणून स्वीकारायला तयार असतात, असं वरील अर्थानं कुणी म्हणू पाहत असेल तर त्याचं म्हणणं मान्य करायला हरकत नाही. अर्थात अशी परिस्थिती प्रत्यक्ष व्यवहारात (गणिताच्याच) अस्तित्वात असल्याचं दाखवण्याची जबाबदारी संबंधित गणित्यावर असतेच. म्हणजेच, रेषेला न मिळणाऱ्या अशा 'अनेक' रेषा त्याच प्रतलात असू शकतात हे दाखवण्याची; आणि तसं दाखवलं गेलंही. पण त्याची चर्चा ह्या लेखाच्या मर्यादेत येऊ शकत नसल्यानं आपण सोडून देऊ. एकच मुद्दा... ह्या वेगळ्या (काही) भूमित्यांतल्या 'रेषा' युक्लिडच्या पहिली चारी गृहीतकं (आणि बदललेलं पाचवं) पाळत असली तरी त्या रेषा युक्लिडची रेषांप्रमाणं 'दिसत' नाहीत! आपण ज्यांना 'वक्र' म्हणतो तशा त्या असतात. उदा. गोलावरील 'रेषा' वर्तुळाकार असतातच की! (स्वीकारायच्या गृहीतकांच्या समूहाला काही कसोट्यांना उतरावे लागते, हा एक महत्त्वाचा मुद्दा आहे. पण तो लेखाच्या कक्षेबाहेरचा असला तरी त्याचा ओझरता उल्लेख तरी जरूर आहे.)

## (२) भिन्न

पुढील वाक्य पहा... बाबूरावांना दोन मुलगे आहेत. सामान्य भाषेत हे वाक्य ऐकल्यावर, बाबूरावांना नेमके दोन मुलगे असल्याची माहिती कोणाही ऐकणाऱ्याला कळते आणि ऐकणाऱ्याचा काहीही गैरसमज होत नाही. त्यांचे ते दोन्ही मुलगे 'भिन्न' आहेत, असं स्पष्टीकरण देण्याच्या फंदात सांगणारा पडत नाही. असं कुणी केलं तरच ते ऐकणाऱ्याला विचित्र वाटेल. पण, गणितात दोन संख्या असं म्हटलं तर दोन भिन्नच संख्या असतील असं समजलं जात नाही. उदाहरणार्थ, हे वाक्य पहा... दोन पूर्णांकांची बेरीज पूर्णांक असते. ह्या वाक्यात अनुस्यूत असलेले पूर्णांक भिन्न असणं जरुरीचं नाही, हे सहज लक्षात येईल. त्यामुळं इथं भिन्न असं म्हणणंच चुकीचं ठरेल. अधिक

अचूक बोलायचं तर, ते म्हणणं अपूर्ण ठरेल. तसंच, 'दोन बिंदू' म्हटलं की ते बिंदू भिन्नच असतील असं गणितात मानलं जात नाही. त्यामुळं, 'दोन बिंदूंनी रेषा निश्चित होते,' हे वाक्य गणितात चालणार नाही. कारण येथील बिंदू भिन्न असल्याचं स्पष्ट सांगावंच लागेल. अन्यथा रेषा निश्चित होऊ शकणार नाही. कारण, मग आपल्याजवळ वस्तुतः दोन बिंदू न राहता केवळ एकच बिंदू असणं हा पर्याय राहील. आणि केवळ एक बिंदू तर, रेषा निश्चित करू शकतच नाही. एका बिंदूतून जाणाऱ्या अनेक रेषा असतात.

या पूर्वीही आपण 'भिन्न' शब्दाचा उपयोग केला आहे. चार भिन्न बिंदूंतून एकच (म्हणजे जास्तीत जास्त एक) वर्तुळ जातं ह्या वाक्यातला भिन्न शब्द जर आपण गाळला तर प्रमेय असत्य ठरेल. ते चार बिंदू म्हणजे जर वास्तवात दोनच असते तर वाटेल तेवढी वर्तुळं जाऊ शकली असती. कारण दोन बिंदूंतून वाटेल तेवढी वर्तुळं काढता येतातच.

मात्र असं असलं तरी जर आपण एकदा आरंभी सांगून टाकलं की इथून पुढं आम्ही मुद्दाम निराळं सांगेपर्यंत दोन संख्या (अथवा बिंदू किंवा जे काय असेल ते) म्हणजे आम्हाला दोन भिन्नच संख्या (अथवा बिंदू) अपेक्षित आहेत, तर दर वेळी आपल्याला 'भिन्न' शब्द वापरण्याचीही जरुरी नाही. म्हणजेच असे तात्पुरते संकेतही गणिती भाषेत वापरण्याची मुभा असते. निराळ्या शब्दांत, रूढ संकेतांना तात्पुरता छेद देणारे संकेत वापरण्याला गणितात कुणी हरकत घेत नाही. काटेकोर किंवा तोलून मापून न बोलण्याचं म्हणजे काहीसं अघळपघळ किंवा मोघम बोलण्याचं भाषिक स्वातंत्र्य जसं एरवी घेतलं जातं, तसं गणितातही घेण्याला बंदी नसते. फक्त कुठं तरी आरंभी तसं स्पष्टपणे सांगितलेलं असावं, अशी अपेक्षा मात्र असतेच. गणिताच्या लेखकांची अणि वाचकांचीही अपेक्षा एकच की ह्याचा परिणाम म्हणून काटेकोरपणाच्या दृष्टीनं गणितात कुठं ढिलेपणा येऊ नये. शेवटी गणित झालं तरी सामान्य भाषेच्या उपयोगाशिवाय व्यक्त करताच येणार नाही. चिन्हांबद्दल बोलताना आपण हे पाहिलंच आहे.

गणिताची पुस्तकं 'वाचनीय' व्हावीत म्हणून मोघम किंवा बोली भाषेत, किंवा वाचणाऱ्याला सुकर होईल अशा 'भाषेत' गणित लिहावं, असा सूर अलीकडे आढळून येत आहे. गणिताची भाषा काटेकोरच हवी हाही एक गैरसमजच आहे. गणित काटेकोर राहिलं म्हणजे पुरे आहे. (दुर्दैवानं कित्येक गणित शिक्षकांचाही काटेकोर भाषेवर अनाठायी भर असतो.)

## (३) तर्कशास्त्र आणि चिन्हांची भाषा

गणितात तर्कशास्त्राचा उपयोग प्रचंड प्रमाणात होतो, किंबहुना गणित म्हणजे तर्कशास्त्राचंच एक रूप होय असं म्हणता येईल. गणित म्हणजे आकारिक (formal) किंवा प्रतीकात्मक (symbolic) तर्कशास्त्र होय. (मी योजलेले मराठी प्रतिशब्द योग्य आहेत की नाही, याची मला कल्पना नाही. पण तूर्त तो वादाचा विषय नाही.) प्रतीकात्मक तर्कशास्त्राचे इतर प्रकार पाहण्याचं आपल्याला कारण नाही. आपण फक्त द्विमूल्य (two-valued) तर्कशास्त्र पाहू. symbol करता 'चिन्ह' ऐवजी प्रतीक हा शब्द मी जाणूनबुजून घेतला आहे. ज्यांचा अर्थ निश्चित असतो त्यांना आपण चिन्ह (sign) म्हणू. उदाहरणार्थ, +, -, x ही चिन्हं होत. त्यांचा अर्थ निश्चित असतो. पण चलांकरता (variable) आपण जी अक्षरं वापरतो त्यांचे अर्थ बदलू शकतात.

मात्र, तरीही, चिन्ह हा शब्द अधिक व्यापक अर्थानंही वापरूच. म्हणजे चिन्ह आणि प्रतीक ह्या दोन्ही अर्थांनी आपण चिन्ह हा शब्द वापरू. नाही तरी गणित म्हणजे चिन्हांचा अतिरेक, इत्यादी म्हणताना आपण ह्या व्यापक अर्थाचाच उपयोग केला आहे.

आधी काही परिभाषा समजून घेणं जरूर आहे. इथली एक मूलभूत (अव्याख्यात) संज्ञा म्हणजे विधान. जरी ही संज्ञा अव्याख्यात असली तरी तिचं काहीसं वर्णन करून ती स्पष्ट करता येईल. आपण नाना प्रकारची वाक्यं वापरतो. काही प्रश्नार्थी असतात. काही उद्‌गारवाचक असतात, इत्यादी. त्यांतील जी प्रतिपादनात्मक वाक्यं असतात त्यांना आपण स्थूलमानानं विधानं म्हणू. ह्या प्रकारच्या वाक्यांत काही तरी ठासून सांगितलेलं असतं. अशा प्रतिपादनात्मक वाक्यांना विधान म्हणतात. जरी अशा वाक्यांत ठासून काही सांगितलेलं असलं तरी ते सांगणं सत्यच असलं पाहिजे असं गणितात अपेक्षिलं जात नाही. ते असत्यही असायला गणिताची हरकत नाही. क्रमविरुद्ध सिद्धतेकरता गणिती बुद्धिपुरस्सर असत्य (खरं तर विरुद्ध) विधान गृहीत धरूनच आरंभ करतो. त्यांचा अर्थ गृहीतकांतून उलगडतो.)

इथं आणखी काही खुलासा हवा. (१) कोणतंही विधान एक तर सत्य तरी असलं पाहिजे **किंवा** असत्य असलंच पाहिजे. (२) तिसऱ्या कोणत्याही पर्यायाला इथं अवसर नाही. आणि (३) कोणतंही विधान एकाच वेळी सत्यही आहे आणि असत्यही आहे, अशी परिस्थिती नसावी. कॉलेजात साहित्य शाखेच्या अभ्यासक्रमातही या कल्पनेचा अंतर्भाव केलेला असतो. त्यामुळं अधिक स्पष्टीकरणाची जरूरी नाही, असं समजतो.

भाषेतील शब्दांना अर्थ असल्यानं (च) अनेकदा गैरसमज होतात, हा सर्वांचाच

अनुभव आहे. कारण शब्दाला एकच अर्थ असतो असं नाही आणि बोलणाऱ्यानं ज्या अर्थानं तो शब्द वापरला असेल तोच ऐकणाऱ्याला भावेल असंही नाही. त्यामुळे, म्हणजे अशा प्रकारचा गोंधळ होऊ नये म्हणूनच, तर्कशास्त्रात अर्थविरहित वाक्यं अथवा विधानं वापरतात. प, फ, ब वगैरे अक्षरं आपण विधानं दर्शवण्याकरता वापरू. इथं पुन्हा खुलासा हवा. ही अक्षरं म्हणजे प्रतिपादनात्मक म्हणूनच संपूर्ण वाक्यं आहेत, याचं भान सतत हवं. म्हणजे गणिती जेव्हा एखादं विधान सांगण्याकरता म्हणून नुसतं 'क' असं म्हणतो. (उदा. क तर ख) तेव्हा प्रथमच गणिती परिच्छेद वाचणाऱ्याला ते समजत नाही. कारण असं काही स्वीकारायला त्याची काहीशी सवय होऊन मनाचीही तयारी व्हावी लागते.

दुसरी बाब म्हणजे विधानांनी काही नियम पाळायचे असतात. ती (विधानं) सत्य (तरी) असतात किंवा असत्य (तरी) असतात. आणि एकाच वेळी दोन्ही नसतात. पुढं जेव्हा आपण 'किंवा' चा विचार करू तेव्हा याचा आणखी उलगडा होईल.

आपल्याला आता चिन्हंच वापरायची असल्यानं सत्य करता स आणि असत्य करता अ, अशी अक्षरंच वापरू. जशी बीजगणितात अक्षरं वापरतात आणि त्यांना किंमती देतात, तशी इथं विधानांकरता अक्षरं वापरतात. आणि त्यांना द्यायच्या स आणि अ ह्या त्यांनी स्वीकारायच्या दोन किमती किंवा मूल्यं आहेत असं म्हणतात. ह्यांना सत्यतामूल्यं **(truth-value)** म्हणतात. आपण याचं समू असं छोटं नाव ठेवू. (सत्यतामूल्य ही संज्ञासुद्धा अव्याख्यात आहे.) आणि वर मांडलेल्या अपेक्षा म्हणजे गृहीतकं होत.

स आणि अ ही अक्षरं वापरण्यामुळं एक महत्त्वाचा उद्देश साधतो. शब्दांच्या मूळ वाङ्मयीन अर्थांपासून त्यांची सुटका होते. शिवाय, आपण स आणि अ हीच अक्षरं घेतली पाहिजेत असंही गणित (तर्कशास्त्र) म्हणत नाही. क्ष आणि ज्ञ अशी अक्षरं, अथवा, + आणि - ही चिन्हं, अथवा कोणतीही दोन (भिन्न) चिन्हं घेतली तरी गणिताला चालतील.

वरीलपैकी प, फ, ब ही प्रतीकं होत कारण त्यांचा अर्थ बदलू शकेल. तर स आणि अ ही चिन्हं आहेत. कारण त्यांचा जो काही अर्थ असेल तो अर्थ निश्चित आहे. बदलत नाही.

आता प हे एक विधान घेऊ. त्याला दोन मूल्यं असतात, स किंवा अ. समजा आपल्याला प आणि फ ह्या दोन विधानांचा एकत्रित विचार करायचा आहे. याची उदाहरणं आपण नंतर पाहूच. ही दोन्ही विधानं स्वतंत्रपणे स आणि अ अशी

मूल्यं धारण करू शकतात. हे लक्षात घेतलं तर एकूण चार प्रकार संभवतात. ते वाक्यात सांगण्यापेक्षा कोष्टकात (म्हणजे चिन्हं वापरून!) लिहून दाखवणं चांगलं. ह्या प्रकारच्या कोष्टकांना समूकोष्टकं (truth-value tables) म्हणतात.

आकारिक किंवा गणिती तर्कशास्त्रात समूकोष्टकांचं महत्त्व खूपच आहे. केलेली विधानं आणि युक्तिवाद (arguments) तर्कसंगत आहेत की नाही ते तपासून पाहण्याची यंत्रणा ती पुरवतात, असं म्हणता येईल.

| प्रकार | प | फ |
|---|---|---|
| १ | स | स |
| २ | अ | स |
| ३ | स | अ |
| ४ | अ | अ |

एका वेळी तीन विधानांचा विचार करायचा असेल तर एकूण आठ प्रकार होतात. तीन विधानांचं कोष्टक लिहून जागा अडवत नाही. फक्त एक निर्देश करतो. प, फ आणि ब अशी तीन विधानं घेऊ. ब सत्य असतानाचे वरील चार प्रकार आणि ब असत्य असतानाचे हेच चार प्रकार असे एकूण आठ भिन्न प्रकार होतात. (गणवृत्तांत तीन अक्षरी गणांची संख्या आठ असते, हे इथं लक्षात घ्यावं. दोन्हींमागील कारणमीमांसा एकच आहे. ज्या वाचकांना भाषा आणि जीवन १३.१ हिवाळा १९९५ मधील 'गण....' हा लेख आठवत असेल, त्यांना हे साम्य जाणवेल.)

**(४) किंवा**

किंवा हा शब्द व्यवहारात दोन प्रकारे वापरला जातो. पण तो कितपत जाणीवपूर्वक वापरला जातो, याबद्दल मला शंका आहे. पुढील दोन वाक्यं पहा...

(१) चहा घेणार की जेवायलाच बसणार?

(२) मी बसनं जाईन किंवा रेल्वेनं जाईन.

पहिल्या वाक्यातला 'की' हा शब्द 'किंवा' ह्या अर्थानंच आला आहे. हे उघड आहे. पहिल्या वाक्याला उत्तर म्हणून कुणी असंही म्हणू शकतो, 'आधी चहा घेतो. आणि मग जेवायला बसेन.' शिष्टाचाराकरता कुणी परक्याकडे असं म्हणतं की नाही, हा मुद्दा गणिताचा किंवा तर्कशास्त्राचा नाही. पण येथील 'किंवा' ह्या शब्दानं 'दोन्ही' घटना घडण्याची शक्यता नाकारलेली नाही, हेच तूर्त महत्त्वाचं आहे.

या उलट, दोन्ही मार्गानं (एकाच प्रसंगी) जाणं अशक्य आहे, हे आपण सर्वजण जाणतो. व्यवहारात 'किंवा' ह्या शब्दाबद्दल किंवा त्या शब्दानं, नेमकं काय

अपेक्षित आहे, हे बोलणाऱ्यानं सांगावं, अशी कुणाचीही अपेक्षा नसते. कारण, संदिग्ध असणाऱ्या शब्दांची व्याख्या, अथवा त्यांचा खुलासा व्यवहारात बोलताना आपण प्रत्येक वेळी करतोच असं नाही. पण, गणितात अर्थ संदिग्ध ठेवून चालत नाही. ह्या शब्दाच्या अर्थव्याप्तीबद्दल तिथं एक कायमचाच संकेत आहे. गणिती जेव्हा 'क किंवा ख' असं म्हणतो. तेव्हा क आणि ख दोन्ही अस्तित्वात असायला त्याची हरकत नसते. कदाचित दोन्ही एकाच वेळी अस्तित्वात येणं प्रत्यक्षात अशक्यही असेल. पण तो त्या प्रत्यक्ष परिस्थितीचा परिणाम. गणित्यांची हरकत आहे असं नाही. नाही तरी 'क' आणि 'ख' यांच्याबद्दल त्यांना कुठं काय माहीत असतं! किंबहुना काही माहीत असावं अशी त्यांची अपेक्षा तरी कुठं मुळात असते!

इथं आणखी थोडासा खुलासा हवा. गणिती जेव्हा, 'क्ष (एक संख्या) धन असेल किंवा ऋण असेल तर... अमुक अमुक घडेल,' असं म्हणतो, तेव्हा क्ष ही संख्या एकाच वेळी धन असणं आणि ऋणही असणं शक्य नसतं, हे त्यालाही कळतं. इथं त्याला एवढंच म्हणायचं असतं, की तर-नंतर येणारं विधान दोन्ही प्रकारच्या परिस्थितींकरता (क्ष धन किंवा ऋण) लागू पडणारं आहे. याच दृष्टीनं, गणितात '२ मोठा किंवा समान २' हे विधान अर्थपूर्ण मानलं जातं. इथं प्रत्यक्षात '२ मोठा २' आणि '२ समान २' अशी दोन विधानं आहेत. भाषेच्या सोयीकरता आपण ती अशी न लिहिता, वरच्याप्रमाणं लिहिली असतील. ह्या दोहोतलं पहिलं असत्य असलं तरी दुसरं सत्य असल्यामुळं 'किंवा' ह्या अव्ययानं जोडून मिळालेलं '२ मोठा किंवा समान २' हे जोडविधान सत्य मानलं जातं. तर्कशास्त्रीय परिभाषा वापरायची तर, क आणि ख ही दोन विधानं दिली असता त्यांच्यापासून बनणारं 'क किंवा ख' हे (जोड) विधान सत्य असण्याकरता त्यांपैकी कोणतंही एक अथवा दोन्ही विधानं सत्य असावीत ही अपेक्षा असते.निराळ्या शब्दांत, 'क किंवा ख' म्हणजे 'क किंवा ख किंवा दोन्ही', असं गणित्यांना सुचवायचं असतं.

कायद्याची भाषा अधिक तर्कशुद्ध राखण्याचा प्रयत्न असतो, असं म्हणतात. तिथं 'क आणि / किंवा ख' असं अधिक स्पष्ट लिहिण्याचा प्रयत्न करतात. मौज म्हणजे आताच स्पष्ट केल्यानुसार, गणितात 'किंवा' हा शब्द गणिती अर्थानं तर येतोच, पण तो व्यावहारिक (किंवा भाषिक) अर्थानंही येतो. कारण गणित समजवण्याकरता नेहमीची भाषा वापरावी तर लागतेच. (इथं कंसात आलाच आहे की!)

प्रश्न असा की 'क किंवा ख' असं म्हणत असताना गणित्याला दोन्ही एकाच वेळी असायला नको असेल तर तो काय करतो? अशा वेळी तो तेवढ्यापुरता खुलासा

करतो. तो म्हणतो इथं आम्हाला 'रहित (exclusive) किंवा' अपेक्षित आहे. एरवीच्या 'किंवा'ला ते 'सहित (inclusive) किंवा' म्हणतात. ह्या कल्पनेचा वापर करायचा तर 'किंवा' ह्या शब्दानं ते 'सहित किंवा' समजावं असा संकेत गणितात आहे. (चर्चा करताना डॉ. कल्याण काळे यांनी अनुक्रमे 'व्यावर्तक' आणि 'समावेशक' असे शब्द सुचवले. पण मी भाषाशास्त्री नसल्याने माझे त्यांबद्दल काही म्हणणे नाही.)

चिन्हांच्या मदतीनं कल्पना अधिक स्पष्ट, अधिक अचूकपणं व्यक्त करता येतात, असं आपण म्हटलं होतं. त्याचं एक परिणामकारक उदाहरण आपण आता पाहू. पण आत्ताच याचा उल्लेख करण्याचं कारण, 'किंवा' हा शब्द गणितात कोणत्या अर्थानं वापरला जातो, याबद्दल जरी एवढा विस्तृत ऊहापोह वर केला आहे तरीही मूळ कल्पना मी नीटशी स्पष्ट करू शकलो आहे, असं वाटत नाही. हेच जर मी चिन्हांच्या भाषेत मांडलं तर ती अधिक स्पष्ट होईल आणि तीही कमी श्रमात, असं मला वाटतं.

एरवीच्या भाषेप्रमाणं गणितात (किंवा तर्कशास्त्रातही) विधानं जोडली जातात. प आणि फ, प किंवा फ, प तर फ वगैरे. जेव्हा प आणि फ अशी दोन विधानं आपण पाहतो तेव्हा त्यांच्यापासून 'किंवा' ह्या अव्ययाचा उपयोग करून 'प किंवा फ' असं एक (जोड) विधान आपल्याला मिळतं. हेही एक विधानच आहे. त्यामुळं तेही सत्य असणार किंवा असत्य असणार. केव्हा सत्य आणि केव्हा असत्य? हे विधान प आणि फ या विधानांपासून बनलेलं असल्यानं त्याचं समू प आणि फ यांच्या समूंवर किंवा त्यांच्या समूंच्या विविध पर्यायांवर अवलंबून असणार, हे उघड आहे. दोन विधानं घेतली तर एकूण चार प्रकार (पर्याय) मिळत असल्यानं या चारही प्रकारांपैकी ते जोडविधान केव्हा सत्य आणि केव्हा असत्य हे सांगितलं पाहिजे. हेही आपण समूकोष्टकाच्याच माध्यमातून सांगू.

| प्रकार | प | फ | प किंवा फ |
|---|---|---|---|
| १ | स | स | स |
| २ | अ | स | स |
| ३ | स | अ | स |
| ४ | अ | अ | अ |

*हे सांगणं म्हणजेच 'प किंवा फ' ह्या जोडविधानाची व्याख्या सांगणं होय.* 'किंवा' शब्दाचा जो अर्थ वर मांडला होता तोच आपण ह्या कोष्टकाच्या माध्यमातून स्पष्ट केला असल्याचं लक्षात येईल. प्रकार २ मध्ये जेव्हा फक्त फ सत्य आहे त्या वेळी जोडविधान सत्य आहे. प्रकार ३ मध्ये फक्त प सत्य आहे त्यावेळीही जोडविधान

सत्य आहे. प्रकार १ मध्ये प आणि फ दोन्ही विधानं सत्य असतानाही जोडविधान सत्य आहे, हा विशेष लक्षात घ्यावा. हे सारं अगदी थोडक्यात मांडायचं तर, 'जेव्हा प आणि फ ही दोन्ही विधानं असत्य असतात, तेव्हाच फक्त 'प किंवा फ' हे (जोड) विधान असत्य असतं आणि बाकीच्या तिन्ही प्रकारांत सत्य असतं,' असं म्हणता येईल.

अथवा, अशी प्रस्तुत जोडविधानाची व्याख्या करता येईल.

'आपण कशाबद्दल बोलत आहोत आणि काय बोलत आहोत, ते आम्हाला माहीत नाही', हे जे रसेलचं वाक्य आरंभी आपण उद्धृत केलं होतं, त्याचा काहीसा प्रत्यय वाचकांना एव्हाना आलाच असेल. ज्या चिन्हांच्या मदतीनं आपण ह्या कल्पना स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला, त्यांचा अर्थच मुळात आपल्याला कुठं ठाऊक आहे!

तर्कशास्त्राच्या ह्या परिभाषेचा ऊहापोह जरा जास्तच तपशीलवार झाला आहे, असं वाटण्याचा संभव आहे. पण, आत्ताच्या आणि पुढच्याही काही मुद्द्यांच्या खुलाशाकरता तो फार उपयोगी ठरणार आहे. तरी वरील परिच्छेदाचं वाचन (गरज वाटल्यास) पुन्हा एकदा करावं अशी विनंती आहे.

पुढं उपयोगी पडणार आहे हे लक्षात घेऊन मी आणखी एका जोडविधानाची चर्चा करू इच्छितो. जसं 'किंवा' च्या साह्यानं आपण विधानं जोडतो तशी 'आणि' च्या साह्यानंही जोडतोच. 'प' आणि 'फ' अशी दोन विधानं दिली असता त्यांच्यापासून आपण 'प आणि फ' असं जोडविधान करू शकतो.

लगेच प्रश्न येतोच. हे जोडविधान केव्हा सत्य आणि केव्हा असत्य? पूर्वीप्रमाणंच चार प्रकारांत याची समू दिली म्हणजे झालं. उदाहरणं देऊन कल्पना स्पष्ट करता येईल. पण तो आपला विषय नाही. तेव्हा स्वाभाविक अपेक्षा काय? दोन्ही विधानं सत्य असताना हे सत्य असावं आणि एरवी असत्य. हेच पुढील समूकोष्टकात मांडलं आहे.

| **प्रकार** | **प** | **फ** | **प किंवा फ** |
|---|---|---|---|
| १ | स | स | स |
| २ | अ | स | अ |
| ३ | स | अ | अ |
| ४ | अ | अ | अ |

*हे सांगणं म्हणजेच 'प आणि फ' ह्या जोडविधानाची व्याख्या सांगणं होय.*

'प' आणि 'फ' ही विधानं स्वतंत्रपणे सत्य असताना 'प आणि फ' हे

जोडविधान सत्य असावं आणि एरवी असत्य असावं, ही सामान्य अपेक्षा ह्या व्याख्येनं पूर्ण होतेच.

'किंवा' आणि 'आणि' ह्या उभयान्वयी अव्ययांनी जोडलेल्या दोन विधानांत (इथं प, फ) अर्थाअर्थी काही व्यावहारिक संबंध असलाच पाहिजे अशी तर्कशास्त्राची मुळीच अपेक्षा नसते. मुळात प आणि फ ही विधानं काय आहेत, हे कुठं आपल्याला माहीत आहे? **इथं आकाराला महत्त्व आहे. अर्थाला नाही.** म्हणूनच तर ह्या शास्त्राला आकारिक (formal) तर्कशास्त्र म्हणतात. आकारिक तर्कशास्त्र म्हणजे एक यंत्र (किंवा यंत्रणा) आहे. प, फ, ब, भ इत्यादी (तत्त्वतः कितीही) विधानं आणि त्यांच्यापासून केलेली जोडविधानं इ. करून जर काही युक्तिवाद कुणी केला तर त्याचा युक्तिवाद सप्रमाण (✓alid) आहे की नाही हे तपासणं सोपं असतं. कारण आपणांस विधानांच्या अर्थामुळं एरवी होणारी अडचण उद्भवतच नाही.

**(५) रिक्त संच**

हेही गणिताचं एक भाषिक वैशिष्ट्यच. एरवीच्या भाषेत आपण रिक्त संचांना कदाचित थारा देणार नाही. वर्गात एकही विद्यार्थी नसेल तर त्याला आपण वर्ग म्हणणारही नाही. परिणामी वर्गात काही मुलं असताना 'आज माझा वर्ग अरिक्त होता,' असं कोणी म्हणत नाही. पण गणितामध्ये रिक्त संचांना वाव असतो. नव्हे महत्त्वही असतं. म्हणूनच विषयाला अथवा प्रमेयाला आरंभ करताना गणिती लोक, 'समजा क हा एक अरिक्त (non-empty) संच आहे,' असं म्हणताना आढळतात, नव्हे तसं त्यांनी स्पष्टपणे म्हणावं अशी अपेक्षा ऐकणाऱ्याचीही असते. अन्यथा एखादी व्यक्ती त्याच्या प्रतिपादनावर, 'क रिक्त असला तरी चालेल का?' असा आक्षेप घेऊ शकतात. कारण काही प्रमेयं रिक्त संचांकरताही सत्य असू शकतात. हे माहीत असल्यानं, 'प्रस्तुत प्रमेय अशा प्रमेयांपैकी नाही ना,' इतकीच खात्री आक्षेप घेणाऱ्याला करून घ्यायची असते.

हे सारं शून्यासारखंच आहे. शून्य ही शुद्ध गणिती कल्पना आहे, हे आपण पूर्वीही मांडलं आहे. तद्वतच रिक्त संच हीसुद्धा केवळ गणिती कल्पना आहे.

**(क्रमशः)**

□□□

**'गजांजली' ४६ वाळवेकर इस्टेट**
**पुणे- ४११००९**

# 'निवडक भाषा आणि जीवन'- काही विचार

ब्रह्मानंद देशपांडे

'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकाने १९९४ अखेर एका तपाची वाटचाल पूर्ण केली. या बारा वर्षांत या नियतकालिकाचे एकूण ४६ अंक निघाले. त्यातील काही निवडक लेखांचा संग्रह 'निवडक भाषा आणि जीवन' या शीर्षकाने कल्याण काळे आणि मृणालिनी शहा यांनी संपादित केला आहे. प्रस्तुत लेख म्हणजे या ग्रंथाचे परीक्षण नव्हे. पण ग्रंथ वाचताना सुचलेले काही मुद्दे तेवढे नोंदवीत आहे.

**१. उपरी भाषा आणि थलकरी भाषा.**

या संग्रहातील 'उपरी भाषा आणि थलकरी भाषा' हा अशोक रा. केळकर यांचा लेख अप्रतिम आहे. ते लिहितात, 'चवथी वाट म्हणजे सीमेबाहेरच्या लेखकाने सरसकट आपल्या स्वतःच्या भाषेत रचना करायची. म्हणजे जी गोष्ट निरक्षर बहिणाबाई चौधरींनी किंवा निमसाक्षर लक्ष्मीबाई टिळकांनी आपसूक केली ती साक्षर माणसाने मुद्दाम करायची. ही वाट वाटते तेव्हढी सहज सोपी नाही.' अशोक केळकरांनी आनंद यादव यांच्या 'खळाळ' या कथासंग्रहातून दोन वाक्ये उद्धृत करून या वाटेवरचे धोके दाखविले आहेत. या धोक्याच्या वळणाची तीन उदाहरणे पुढे देत आहे.

अ. 'शेतकऱ्याचा पाहुणचार' ही ग.ल. ठोकळ यांची गाजलेली कविता. या कवितेतील

*लई सुगरन हाये माही कारभारीन ।*
*कसं अप्पुक झालंय् कांद्याचं बेसन ॥*

(स्मरणातून)

या ओळी वाचून अशीच ठेच लागली होती. पाहुण्यांसमोर आपल्या 'कारभारनी' च्या रांधण्याची आणि सुगरणपणाची स्तुती करणारा मराठमोळा शेतकरी काही केल्या डोळ्यांसमोर येईना. शेतकरी तर सोडाच पण अगदी सुशिक्षित पांढरपेशा मध्यमवर्गातही (विशेषतः मागच्या पिढीत) हा प्रकार आढळणे दुरापास्तच.

ब. 'अभिरुचि' या नियतकालिकाच्या जानेवारी-फेब्रुवारी १९८१ च्या अंकात पद्मवंदन देवगावकर यांची 'निगवे दुमाला ते गगनबावडा -परवास वर्णन' ही कथा प्रकाशित झाली आहे. संपूर्ण कथा कोल्हापुरी बोलीत आहे. (मग 'परवास वरनन' असं का नाही?) सगळी कथा अस्सल कोल्हापुरी बोलीत

सांगताना धोक्याच्या वळणावर गाडी घसरली. ती अशी

'थोडका येळ कावरल्या-बावरल्यागत हूण, हिकडं-तिकडं बगून तेनं आपल्या हातातली कुर्‍हाड आपल्या साथीदाराकडं दिली आन येकायेकी मिरमिटल्यागत माज्या पायागतीला लागून ते डांबार **उद्गारलं** -------- '(पृष्ठ २६.)

यातील 'उद्गारलं' हा अस्सल संस्कृत आणि केवळ प्रमाणभूत ग्रांथिक भाषेतला शब्द, लेखक 'थलकर' झाल्यावर आपलीच बोली लिहितांना कसा घसरतो हे दाखवून देतो

क. नुकतीच प्रकाशित झालेली 'रूपसावली' ही तानाजी राऊ पाटील यांची कादंबरीही संपूर्णपणे कोल्हापुरी बोलीत लिहिलेली. शेतकरी कुटुंबात जन्मलेले तानाजी पाटील अशाच धोक्याच्या वळणावर आले आणि 'नुकत्याच घराघरातल्या चुली पेटलेल्या. खापऱ्यातनं धुराची वेडीवाकडी **वर्तुळं** वळनं वळसं घित घित वर जाईत व्हती' असे लिहून गेले. खेड्यात धुराची वेटोळी (खरंतर येटोळी) असतात हे नागर झालेले पाटील विसरले. (रूपसावली, १९९८, पृ. २९)

## २. मराठी आडनावें.

मराठी आडनावे या आगळ्या वेगळ्या विषयावर पीएच्. डी या पद्वीसाठी प्रबंध लिहून गाजलेल्या रामगोपाल सोनींचा लेख रेखीव आहे. पुढील माहिती नोंदवतो.

अ. साहित्य आणि कलासूचक आडनावांत 'निबंधे' हे आडनाव घातले आहे. त्याचा निबंध (essay, compostion) या साहित्यप्रकाराशी संबंध नसावा. स्मृती वा समाजनियमविषयक ग्रंथांना 'निबंध' म्हणतात. चतुर्वर्ग चिंतामणिकार हेमाद्रि पंडित हा निबंधकार म्हटला जातो. शूलपाणि हाही निबंधकारच. सामाजिक अपराध वा वादप्रसंगी शास्त्राधार काढून देतात ते निबंधे, लीळाचरित्रातील नोंद अशी:

'मग तेही नीबंधकार ब्राम्हण बोलाविले : मग तेही नीबंध काढिले: नीबंधी पाहिले: (लीळाचरित्र, पूर्वार्ध लीळा क्र. २७)

शास्त्रातील 'प्रमाणे' काढून देतात ते 'प्रमाणिक'. हे आडनाव आजकाल 'प्रामाणिक' असे लिहिले जाते. प्रमाणिक आणि निबंधे ही आडनावे व्यवसायसूचक आहेत.

ब. 'वासूनाका' ही भाऊ पाध्ये यांची गाजलेली कृती. मामू आणि भानू यांचे लफडे असते. पण ते एकमेकांचे मावस बहीण-भाऊ असतात. मामूची आई

या विवाहाला शास्त्राधार मागते. 'तू माका उतारा दी.' (वासूनाका. पृ.७).

क. सेंद्रक अथवा सिंद हे प्राचीन राजकुल. त्यांचे लेख खानदेश, मराठवाडा, कर्नाटक आणि आंध्रप्रदेशात सापडतात. ते स्वतःला नागवंशीय म्हणवतात आणि आपले मूलस्थान अहिच्छत्रा नगरी असल्याचे सांगतात. त्यांच्यापासून शिंदे कुलाची उत्पत्ती आहे. भारताचे माजी अन्नमंत्री अण्णासाहेब शिंदे यांच्या कुलपूजेत नाग आहे. केशिराजव्यासकृत दृष्टान्तपाठात 'सींदेराणे यांचा दृष्टान्त' आहे. मागे या आडनावाविषयी अभिरुचिहीन चर्चा झाली होती. ती आता विसरणे योग्य ठरेल.

ड. निसर्गसूचक आडनावात 'समुद्रे' आहे. अकोला (विदर्भ) येथे शंकरराव समुद्र हे वकील आहेत. ते आमच्या (देशस्थी) नात्यात आहेत. त्यांच्या घरच्या लग्नपत्रिकांवर 'श्री पाणिदेव प्रसन्न' असे कुलदेवतावंदन असते. दलितांमध्ये जलपूजकांचा संप्रदाय आहे. ढेगु-मेघु या जलदेवतेचे ते उपासक आहेत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या मागे डोंगरांची रांग आहे. तिच्या पलीकडे जटवाडा नामक खेडे आहे. तेथे या जलदेवतांचे ओटे आहेत. तसे ते डोमेग्राम (तालुका नेवासे, जिल्हा अहमदनगर) या महानुभावपंथीयांच्या तीर्थस्थानीही आहेत. आडम (तालुका कुही, जिल्हा नागपूर) येथील उत्खननात 'अबदस' अशी ब्राह्मी लिपीतील अक्षरे (इसवी सनाचे पहिले शतक) मृण्मुद्रा सापडली आहे. अब्द शब्दाचा पाणी असा अर्थ शब्दकल्पद्रुम कोशात आहे. कामरूप येथील बलवर्मन तृतीय याच्या हौराघाट ताम्रपटात अब्दपूजेचा उल्लेख आहे. (Epigraphia Indica., XXXII., p. 287.). पण 'अब्द' शब्दाचा 'वर्ष' हा अर्थही विचारात घ्यावा लागेल.

ड. शौच, शुचिता, पवित्रता यापासून शौचे हे आडनाव आले आहे. मलमूत्रविसर्जन करून शरीरशुद्धी करणे यासाठी शौच शब्द वापरला गेला आणि त्याचा सगळा अर्थच बदलून गेला. अनेक शिलाहार राजांनी 'शौचगांगेय' हे बिरुद धारण केले होते.

### ३. पचवून टाकलेले वाघिणीचे दूध

'पचवून टाकलेले वाघिणीचे दूध' हा आशा मुंडले यांचा लेख इंग्रजी-मराठीच्या मैत्रीवर प्रकाश टाकणारा आहे. पुढील माहिती नोंदवतो.

अ. काळ्या दगडावरची रेघ परकीय नव्हे. सातवाहन नृपती हाल याच्या गाथा-सप्तशतीत (इसवी सनाचे पहिले शतक) ती सापडते. ती अशी

कीरन्ती व्विअ णासइ उअए रेह व्व खलअणे मेत्ती ।
सा उण सुअणम्मि कआ अणहा पाहाणरेह व्व ॥२७२॥
दुष्टांची मैत्री पाण्यावरची रेघ. ओढल्याबरोबर नष्ट होते. पण सज्जनांची मैत्री दगडावरची रेघ. कायम टिकते.

ब. तोंडाला पाणी इंग्रज यायच्या आधीही सुटत होतेच. धंद्याने शिकलगार असलेल्या सगनभाऊंच्या 'मनात हसले ग बाई हसले' या प्रख्यात लावणीच्या पहिल्या कडव्याचा प्रारंभच 'लुगडे निरीत फिटले । भ्याले तोंडाला पाणी सुटले' असा आहे. (सगनभाऊकृत लावण्या व पवाडे., सं. दि. गं. केळकर, पृ. ७४)

क. सोम्या-गोम्या हे टॉम, डिक आणि हॅरी यांचे सहचर वाटतात खरे पण ते 'होळकरांच्या कैफियतीत' 'सोम्या मारी गोम्याला, प्रायश्चित्त राजधराला' या वाक्प्रचारात भेटतात. (होळकरांची कैफियत. सं. य. न. केळकर, पृ. २५).

ड. सशाचे काळीज नसो पण 'सशेधाक' मात्र सर्व शब्द कोशांत आणि वाक्संप्रदाय कोशांत सापडतो.

## ४. ज्ञानेश्वरी आणि तेलुगू

'ज्ञानेश्वरी आणि तेलुगू' हा लेख ज्ञानेश्वरीतील शब्द भांडारावर तेलुगूचा प्रभाव सांगणारा आहे. काही विवाद्य मुद्दे असे-

अ. राष्ट्रकूटांच्या शिलाताम्रशासनांवरच मी प्रबंध लिहिला आहे. हा राजवंश काकती देवीचा उपासक असल्याचे मला तरी आढळले नाही. कृष्ण द्वितीय आणि कृष्ण तृतीय यांच्यासह काही काकतीय शिलाहार युद्धावर जात असत याचा आधार नोंदल्या जाता तर बरे होते. काकतीय रुद्रम्मादेवीने देवगिरीचा यादव सम्राट महादेवराय याचा पराभव करून त्याला बंदीवासात टाकले असे वर्णन एकाम्रनाथाच्या 'प्रतापचरित्रमु' या ग्रंथात येते. या एकाम्रनाथाला रुद्रम्मा ही कुणाची कन्या हेही धड ठाऊक नाही. उलट हेमाद्रि पंडित महादेवानेच तिल्लिंगाचा पराभव केला असे नोंदवतो. (ब्रह्मानन्द देशपांडे, देवगिरीचे यादव, पृष्ठ १४१-१४२). प्राचीन अभिलेखात अशी अतिशयोक्त वर्णने येतात.

ब. हेमाद्रि पंडित अथवा हेमाडपंत तेलुगू नव्हे. तो वरदा (वर्धा) नदीच्या तीरावरील वेदपद गावचा राहणारा होता. केवळ नावावरून त्याला कानडी वा तेलुगू ठरवता येणार नाही. हेमाद्रि हे नाव बारशी टाकळी (जिल्हा अकोला) येथील शके १०९८ च्या आणि पाटण (तालुका चाळीसगाव, जिल्हा

जळगाव) येथील शके ११३२ च्या लेखात हेमाडिदेव असे आले आहे.

क. अडदरा येथील अड, आड आणि दरा ही पदे मराठी प्रमाणेच हिंदीतही आढळतात. लेख हा शब्द लीळाचरित्रात (पूर्वार्ध लीळा क्र. ३६६, उत्तरार्ध लीळा क्र. २६८) आणि गोविंदप्रभुचरित्रात (लीळा क्र. १५२, १५३) आला आहे. तो लिख् = लिहिणे, या धातूच्या लेख्य या साधितापासून आला असावा.

सहज सुचले म्हणून लिहिले. शास्त्रचर्चेविना अन्य हेतू नसे.

□□□

**ऐतिहासिक, १४ अनुपम वसाहत**
**श्रेयनगर, औरंगाबाद -४३१००५**
**दूरध्वनी (०२४०) ३३६६०६**

---

## शेवटी येणारे पहिले गाव

बनिहाल खिंडीपासून एखाद्या काथ्याच्या सतरंजीच्या गुंडाळीसारखा उलगडत येणारा रस्ता अनंतनागजवळच्या एका तिठ्यावर येऊन थांबतो. एका प्रचंड चिनार वृक्षावर आदळल्यामुळे या प्रवाही रस्त्याचा ओघ दुभंगतो. डाव्या हाताला वळा, सोळा कोसांवर श्रीनगर आहे. उजव्या हाताला वळा, सोळा कोसांवर पहलगाव आहे. सगळ्या मुशाफिरांचा रस्ता चुकतो तो इथेच. सगळे आपले वाममार्गाला लागतात, आणि श्रीनगरात जाऊन कडमडतात. पहलगाव म्हणजे अर्थात् (अक्षरशः) पहिले गाव. पण एवढा विवेक वेळीच न सुचल्यामुळे माणूस इतस्ततः भटकतो, दमतो, निवतो आणि मग शेवटी 'पहिल्या गावाला'जातो !

*बारा गावचं पाणी, वसंत बापट, पहिली आवृत्ती- १९६६*
*पॉप्युलर प्रकाशन मुंबई*

□□□

**प्रेषक : शरद कृष्णाजी बोडस**
**अद्वैतानंद को- ऑ. हौसिंग सोसायटी,**
**१२२१ सदाशिव पेठ, पुणे- ४११ ०३०.**

# मराठी विज्ञानपुस्तिका : स्वागतार्ह सुरूवात

नंदा खरे

सध्या शाळांमध्ये शिकवले जाणारे विज्ञान हे खऱ्या अर्थाने विज्ञानच नसते, असे विज्ञानात रस असलेल्या बहुतेकांचे मत असते. यावर उतारा म्हणून 'विज्ञान शोधिका' नावाची एक संस्था निघाली आहे. त्यांच्या जाहीरनाम्यात विज्ञानाबद्दल शोधकवृत्ती आणि सर्जनशीलता जागवणे, आणि वैज्ञानिक कामासाठी आवश्यक अशी कौशल्ये विद्यार्थ्यांमध्ये रुजवणे या दोन गोष्टींवर भर दिलेला आहे.

याच कामाचा एक भाग म्हणून या संस्थेने १९९८ साली बारा पुस्तिका प्रकाशित केल्या आहेत. त्यापैकी 'डॉली, द क्लोन', 'सी.टी. स्कॅन -डॉक्टरांचा तिसरा डोळा' आणि 'मैत्री मधमाश्यांशी' या तीन पुस्तिका वाचून सुचलेल्या बाबी मांडत आहे.

पुस्तकांची छपाई व कागद उत्कृष्ट आणि टिकाऊ आहे. माहिती, चित्रे, कोष्टके, अशा अनेक वाटांनी विषय समजावून दिले गेले आहेत. माहितीचा नेमकेपणा व व्याप्ती यांच्यात लेखकांचा तज्ज्ञपणा पुरेपूर दिसतो, मुळात तांत्रिक विषय सोपे आणि रंजक करण्यासाठी उदाहरणांचा वापरही छान केला गेला आहे. सी-टी स्कॅनसारखे कठीण तंत्रही उदाहरणांमधून सुलभ केले आहे. क्लोन, टेस्ट-ट्यूब बाळे, या साऱ्या बाबी काही मराठी वृत्तपत्रांनी केवळ 'साईंस का चमत्कार' या पातळीवरच हाताळल्या आहेत. इथे मात्र त्यामागचे शास्त्र समजावून देण्यावरच भर आहे आणि सोबत हे शास्त्र पुढे कोणकोणत्या दिशांनी पुढे जाईल याचाही कानोसा घेतला आहे. मधमाश्यांच्या आयुष्यक्रमाचे वर्णनही अत्यंत रंजक तपशील देत केलेले आहे. पुस्तिकांमध्ये वापरलेल्या संज्ञांच्या सूची, पुढील वाचनासाठी संदर्भग्रंथांच्या याद्या वगैरे पूरक बाबीही आहेत.

ह्या झाल्या पुस्तिकांच्या जमेच्या बाजू-जरा त्रोटक रुपात सांगितलेल्या. पण मराठीत एकूणच विज्ञानविषयक पुस्तके कमी आहेत, त्यामुळे जी काय पुस्तके निघतात ती कशी असावी यावर जास्त चर्चा आवश्यक आहे. या बारा पुस्तिकांच्या संपादक मंडळानेही अशा चर्चेची इच्छा प्रदर्शित केली आहे. पुढील सर्व लेखनाचा या 'नजरे'तून विचार व्हावा.

विज्ञानावर लिहिताना, त्यातही मराठीतून लिहिताना, कोणता वाचक अपेक्षित आहे याला फार महत्त्व येते. अपेक्षित वाचक म्हणजे खरे तर वाचकाचा अपेक्षित ज्ञान-साठा. इथे बारा ते अठरा वर्षे वयाचा वाचक, हे लक्ष्य आहे. सातवी





अनुक्रमणिका

ते तेरावी म्हणू या. आता या सहा वर्षांतील ज्ञानसाठ्यांत प्रचंड फरक असतात. नागपूरच्या मराठी विज्ञान परिषदेने मागे आठवी-नववीतल्या मुलांसाठी काही कार्यक्रम घडवले. अगदी आठवी आणि नववी हा फरकही 'पचवायला' थोडी फार कसरत करावी लागे. विज्ञान शोधिकेच्या संपादकांना या प्रश्नाची जाण आहे. पुस्तिका मुळातच 'निर्धारित' वयोगटाला 'वरच्या' वाटतील, हे त्यांनी नोंदले आहे. म्हणजे पुस्तिकांमध्ये टप्पे ठरवून तशी 'नेमबाजी' करणे आवश्यक आहे. आजच्या रुपातील पुस्तिका खरे तर पदवीधारकांसाठी असाव्या तशा दर्जाच्या आहेत.

या पुस्तिकांचे लेखक पदव्युत्तर विद्यार्थ्यांना शिकवणारे असल्यामुळे असे झाले असावे. 'खालच्या' किंवा खरे तर 'सुरुवातीच्या' वयोगटांना विषय समजावून देण्यास काटेकोरपणापेक्षा रंजकतेची गरज जास्त असते. इथे छपाई व चित्रे-आकृती आकर्षक, पण मजकूर मात्र जरा जास्तच काटेकोर असे झाले आहे. चांगल्या शालेय शिक्षकांकडून तज्ज्ञांच्या मार्गदर्शनाखाली पुस्तिका लिहवून घेणे एखादेवेळी परिणामकारकता वाढवेल. पुस्तिका कमी माहिती देणाऱ्या असायलाही हरकत नाही, पण कुतूहल वाढवणाऱ्या मात्र हव्याच. काही अपवाद वगळता भारतीय विद्यार्थी प्रश्न विचारण्यापेक्षा उत्तरे शोधण्यावर भर देतात म्हणून तर 'क्वेश्चन बँक' हा अघोरी प्रकार लोकप्रिय होतो! हे जर प्रयत्नपूर्वक तोडायचे असेल, तर प्रश्न विचारण्याची सवय लावायला हवी. पुस्तिकांमध्ये काही जागी माहिती न देता प्रश्नच विचारावे का? उत्तरे शोधायला विद्यार्थी आपापल्या पालक-शिक्षकांना छळतील, हाही एक सुपरिणामच !

माहिती कमी देण्याचे सुचवण्यामागे आणखीही एक कारण आहे. पुस्तिकांमध्ये मजकूर इतका खच्चून भरला आहे, की कोठे कोठे शब्दांमध्ये अंतरच नाही ! हे टाळायला हवे. अशा गच्चपणाने रंजकता फार उणावते.

काही मुद्दे मराठीच्या वापराशी संलग्न आहेत. उदाहरणार्थ, 'तिसरा डोळा' या शब्दाला मराठीत संदर्भ आहे शंकराचा आणि विनाशाचा. 'ज्ञानचक्षू' हा अर्थ लेखकाला अभिप्रेत असणार. जेथे संवाद साधणे महत्त्वाचे आहे तिथे अशा गोंधळाच्या शक्यता कटाक्षाने टाळायला हव्या. काही चित्रांमध्ये व आकृत्यांमध्ये तर मराठी नाहीच. डॉली द क्लोन' मध्ये काही चित्रांचे, आकृत्यांचे मथळे इंग्रजी भाषेत रोमन लिपीत आहेत. जर पुस्तिका शहरांमध्येच घुटमळायला नको असतील, तर खरेखुरे 'मराठीकरण' व्हायला हवे.

शेवटी एक 'जड' मुद्दा- मधमाश्यांबद्दल. लेखकाने मधमाश्यांच्या रेखीव

पोळ्यांबद्दल, तापमान स्थिर ठेवण्याच्या कौशल्याबद्दल बरेच लिहिले आहे. त्यातल्या माहितीचा भाग बिनचूक व रंजक आहे. पण हे मधमाश्यांचे वागणे विचारांमधून येत नाही तर अगदी जनुकांच्या पातळीत यांत्रिकपणे, जडपणे रुजलेले असते, हे स्पष्ट व्हायला हवे होते. इथे काहीशी भावनिक मांडणी दिसते -जसे, 'मधमाशी -एक आदर्श सामाजिक कीटक' हा मथळा, आणि इतर अनेकानेक संदर्भ (''मधमाश्यांनी त्यांच्या स्वत:च्या विकासासाठी सपुष्प वनस्पतींचे ऋण मानले पाहिजे'')

एखादे वेळी हे रंजकतेसाठी केलेले वैज्ञानिक तटस्थपणाचे 'बलिदान' असेल- पण हे पटण्याजोगे नाही. विचारी वर्तन आणि अंत:प्रेरित वर्तन यांत फरक करायलाच हवा. एक गंमत पहा-माधमाश्यांच्या पोळ्यातील प्रत्येक 'घर' षट्कोनीच असते. प्रयत्न करूनही मधमाश्यां चौकोनी वगैरे आकारांची घरे करू शकत नाहीत. मग त्यांच्या त्या रेखीव घरांमध्ये 'वास्तुकलेचा' वास तरी का यावा ?

यातूनच सुचणारा मुद्दा - पहिल्या बारा पुस्तिकांमध्ये उत्क्रांती हा विषय कसा नाही? 'निसर्गातील पायाभूत बले' जर आहेत, तर सर्व जीवशास्त्राला तात्त्विक चौकट पुरवणारी उत्क्रांती ही आवश्यक आहे.

पण हे सारे 'ऋण' बाजूचे मुद्दे विचारात घेऊनही या पुस्तिकांचे मोल भरपूर आहे. (खरे तर माझ्या लिखाणातील 'ऋण' सूरही काहीसा सहभाग न घेता येण्यातून उपजलेला आहे!) पुढील पुस्तिका जास्त जास्त नेमक्या व निर्दोष होतील अशी खात्री वाटते, कारण सारे संपादकमंडळ प्रयत्न प्रयोग, निष्कर्षांची तपासणी, नवे प्रयोग या वैज्ञानिक माळेशी परिचित आहेतच.


१. *मैत्री मधमाशांशी, क. कृ. क्षीरसागर, पृष्ठसंख्या ८८,*

२. *डॉली द क्लोन, दिप्ती देवबागकर, पृष्ठसंख्या ५८,*

३. *सी टी स्कॅन - डॉक्टरांचा तिसरा डोळा, पंडित विद्यासागर, पृष्ठसंख्या ५६*
*तीनही पुस्तकांचे प्रकाशक : शेखर फाटक अँड असोसिएट्स १९९८*
*किंमत प्रत्येक रू.८०*


□□□


**१९३ मश्रूवाला मार्ग, शिवाजीनगर,**
**नागपूर- ४४० ०१०, दूरध्वनी- ५३१९४८**

# पंड्यांची भाषा : मुक्काम वाराणसी, दिल्ली, संयुक्त राष्ट्रसंघ

**अशोक रा. केळकर**

सोसियॉलजी ऑव्ह सीक्रेट लँग्वेजिज (शिमला : इंडियन इन्स्टिट्यूट ऑव्ह ॲडव्हान्स्ट स्टडीज, १९७७) या आपल्या लक्षणीय शोधप्रबंधात बनारस हिंदू विद्यापीठाचे प्राध्यापक राजाराम महरोत्रा वाराणसीच्या पंडे लोकांच्या परंपरेने घडलेल्या गुप्त बोलीचे वर्णन करतात : ''त्यांच्या भाषिक मुखवट्यामुळे त्यांना आपला व्यवसाय, वैध-अवैध जसा कसा असेल तसा, निर्वेध चालवायला मदत तर होतेच, पण शिवाय अनभिज्ञ इतरेजनांच्या मनात दरारा आणि रहस्यभाव उत्पन्न करण्यासाठी आणि आपले गटापुरते वेगळेपण जपण्यासाठी देखील मदत होते.'' आजकालच्या आपल्या राजकारणी मंडळींचे तरी काय वेगळे चालते? यात्रेकरूंच्या भाविकपणाचा गैरफायदा घेणाऱ्या उपाध्यायमंडळींच्याप्रमाणेच आपली राजकीय नेतेमंडळी पण एक खास झाकापाक करणारी सांकेतिक शब्दयोजना करीत नाहीत का? 'राष्ट्रीय सुरक्षितता', 'कायदा आणि सुव्यवस्था', 'सुधारणा', 'स्वदेशी', 'हिंदुत्व' आणि निधर्मिता'! सगळ्या अपवित्र मनसुब्यांवर घातलेली पावित्र्याची आच्छादने! यात्रेकरू आणि देव यांच्यामध्ये अडसर ठरणाऱ्या पंड्यांप्रमाणेच नागरिक आणि लोकसत्ता यांची चुटपुटती दृष्टिभेट घालून देणाऱ्या या राजकारणी पहारेकऱ्यांची नागरिकांना मनधरणी करावी लागते.

सिद्धार्थ वरदराजन, 'नो पॉलिटिक्स इन आवर पॉलिटी'

हॉलिवुडनिर्मित युद्धचित्रपट आणि दूरचित्रवाणीवरची ख़ऱ्याखुऱ्या युद्धाची चित्रफीत सारख्याच निर्विकार तल्लीनपणाने पाहणारे पाश्चात्त्य नागरिक आणि आपण सुरू केलेल्या 'धर्मयुद्धा'चे समर्थन करणारे त्यांचे मुत्सद्दी हेही अशीच शब्दांची उधळण करीत असतात - 'मानवी हक्क', 'स्वयंनिर्णय' इत्यादी. पण पाश्चात्त्यांचे रक्त सांडायची वेळ आली तर मात्र - बॉस्नियात संयुक्त राष्ट्रांच्या फौजांचे नेतृत्व करणाऱ्या एका फ्रेंच सेनापतीच्या शब्दात विचारायचे तर ''मारायला तयार असलेल्या पण मरायला तयार नसणाऱ्या शिपाईगड्याला शिपाईगडी कसे म्हणायचे?''

रश्मी अहमद, 'कोसोवो, द मूव्ही : टेकिंग अप द व्हाइट मॅन्ज बर्डन'

टाइम्ज ऑव्ह इंडियाच्या १७ : ०४ : १९९९ च्या अंकातील दोन लेखांवरून. (पहिल्यातून अवतरण, दुसऱ्यातून अंशतः गोषवारा)

□□□

## १. पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियत कालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधीचे निवेदन, वृत्तपत्र आणि पुस्तके नोंदणी अधिनियम कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून

१. प्रकाशन स्थळ : पुणे, महाराष्ट्र
२. प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक : जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबरमध्ये.
३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : मृणालिनी शहा, भारतीय, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४, एरंडवन, पुणे ४११ ००४.
४. मुद्रणस्थळ : सिद्धी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११ ०२९
५. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : मृणालिनी शहा, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, पत्ता कलम ३ प्रमाणे.
६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : विजया देव, भारतीय सुप्रिया, ६१/१४ एरंडवन, पुणे ४११००४
७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता : एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे अधिकार किंवा भागधारक त्यांची नावे व पत्ते :

मराठी अभ्यास परिषद, द्वारा: अशोक रा. केळकर, ७ धनंजय सोसायटी, ७५९/८३ शिवाजीनगर, पुणे ४११ ००४

मी मृणालिनी शहा असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**पुणे ३० जून १९९९** **मृणालिनी शहा**
**प्रकाशक.**

## २. वार्षिक सर्वसाधारण सभा

मराठी अभ्यास परिषदेची वार्षिक सर्वसाधारण सभा शनिवार २१ ऑगस्ट १९९९ रोजी संध्याकाळी ५ वाजता साहित्य परिषद (पहिल्या मजल्यावरील सभागृह) टिळक रस्ता, पुणे ४११ ०३० येथे होईल.

□□□

# कथा वक्तृत्वाची

**शिवाजीराव भोसले**

प्रा. सरदारांच्या बोलण्यात कृत्रिमता नसे. अकारण आरोह-अवरोहाचे अवाजवी तंत्र अवलंबणाऱ्या त्या वक्त्यांची कारागिरी नसे. होती ती गंगाप्रवाहाची प्रासादिकता.

प्रा. सरदारांसारख्या अधिकारी प्रबोधनकाराची भाषणे ऐकल्यानंतर एक गोष्ट लक्षात येते, की भाषणांची संख्या, व्यक्ती आणि विषय यांवर बंधन घालून घेणे आवश्यक आहे. आलेली अनेक निमंत्रणे नाकारून विवेकाचे सूत्र सांभाळणे गरजेचे आहे. अनेक वक्ते भिडेला बळी पडतात. वस्तुतः त्यांचे विचार तसे कोणाला नको असतात. फक्त त्यांच्या लोकप्रियतेची पायरी-करून कार्यक्रमाचा कळस गाठावयाचा असतो. एका समारंभात व्यासपीठ व्यापणारे अनेक महाभाग पाठीशी घेऊन पुढे बोलावे लागते. मागे असणारे अनेक एकमेकांना टाळ्या देतात, प्रसंगी वर्तमानपत्रे चाळतात किंवा आडकित्त्याचा आधार घेतात. ज्यांचे भाषा, विचार, समाज आणि वक्तृत्व यावर प्रेम असेल त्यांनी अशा सभांना जाऊ नये. ग्रामीण भागातील बऱ्याच सभा या प्रकारच्या असतात. त्या भावनांचे आणि प्रतिष्ठेचे विषय होऊन बसतात. बोलवणाऱ्यांना बरे वाटावे, असे बोलणे भाग पडते. हे बोलणे बरे असते; पण खरे नसते. बोलणाऱ्याला हे कळत असते; पण कळूनही या भोवऱ्यात तो अडकून पडतो. हा दु:खद अनुभव मी स्वत: अनेक वेळा घेतला आहे. उमेदवारीच्या काळात उदयोन्मुख वक्त्याला अनिच्छेने आपल्या जाणिवेचे हवन करावे लागते. काही वेळा कार्यकर्त्यांना बळ पुरविण्यासाठी सभांना हजर राहून अप्रस्तुत वक्तव्य करण्याचे कर्तव्य लोकनेत्यांना पार पाडावे लागते. अशा सभांत वारंवार बोलल्यामुळे बुद्धी बोथट होते, विचारांना ग्लानी येते.

शिक्षणप्रसारामुळे ग्रामीण भागात अनेक वकील व प्राध्यापक दिसू लागले आहेत. त्यांना प्रचारकार्याच्या धुरेला कुशलतेने जुंपण्याचे काम केले जाते. ही मंडळी वयाने लहान व वृत्तीने होतकरू असतात. समोरच्या जनसागरात आपल्या वक्तृत्वाची होडी वल्हविण्याचा मोह त्यांना पडतो. यात थोडी गंमत, थोडा आनंद असतो. काही प्रसंगी अपवाद म्हणून जे करावे लागते ते सतत करण्याची सवय लागते. प्राध्यापकांनी वर्गात व वकिलांनी न्यायालयात ज्या प्रकारचे आटोपशीर, तर्कशुद्ध आणि अर्थपूर्ण बोलणे करणे अगत्याचे असते ते करण्याची त्यांची क्षमता ते गमावून बसतात. हे त्यांचे नुकसान टाळणे त्यांना शक्य असते. आत्मनिरीक्षण व आत्मपरीक्षण हाच वक्तृत्वाच्या क्षेत्रातही आत्मोद्धाराचा मार्ग ठरतो.

**सकाळ: रविवार, १२ एप्रिल १९९८**





अनुक्रमणिका

## आईचे अज्ञान

सध्या आमचा मुक्काम स्पेनमध्ये असल्यामुळे राबर्टो आमच्या लहानग्या मुलाला - रॉबर्टिनोला घेऊन बैलांची झुंज बघायला घेऊन जाणारच होता. मला या खेळाचा तिटकारा आहे. मी गेले नाही. मी इतकी अस्वस्थ होते, इतकी बेभान झाले होते! मी म्हणाले, ''रॉबर्टिनो अजून फार लहान आहे. लोकांच्या करमणुकीसाठी इतक्या सुंदर प्राण्यांना ठार करतात, हे मला बघवत नाही. झुंजणाऱ्याचं ठीक आहे. आपण आपलं आयुष्य धोक्यात घालतोय हे त्याला माहीत असतं आणि तो फार धाडसी असतो. पण या सगळ्याबद्दल बैलाला काय वाटतं, हे त्याला कुणीच विचारत नाही.''

स्पॅनिश लोकांची मृत्यू, नाटक आणि क्रोध यांच्यात असलेली गुंतवणूक माझ्या स्वभावात बसत नाही. साधी माशी मारणेदेखील मला सहन होत नाही. त्यांना मारायच्या आधी मी नेहमी त्यांची क्षमा मागते.

रॉबर्टिनो एका दिव्यातून जाणार होता, म्हणून मी त्याला तयार करण्याचा प्रयत्न केला. मला वाटते मी जरा जास्तच केले. बैल म्हणजे नाकपुड्यांमधून आगीच्या ज्वाला बाहेर फेकणारा ड्रॅगन आहे, अशा तऱ्हेचे चित्र मी त्याच्यापुढे उभे केले.

रॉबर्टिनो घरी परत आला, तेव्हा तो नेहमीप्रमाणेच अगदी व्यवस्थित होता. त्याची खेळण्यातली लहानशी कार चालवण्यात जास्तच दंग झाला होता.

तो अस्वस्थ दिसला नाही आणि त्याने मला काही सांगितलेही नाही. मला वाटले, ते त्याच्या अंतर्मनात खोलवर कुठेतरी जाऊन बसले असले पाहिजे. म्हणून मी त्याला विचारले,

''बैलांच्या झुंजीबद्दल तुला काय वाटलं?''

त्याने उत्तर दिले नाही. ऱ्हूमऱ्हूम करत आपली कार चालवत राहिला. मी पहिल्यापेक्षाही जास्त कडक स्वरात प्रश्न केला.

''तुला बैलांची झुंज आवडली का?''

तो म्हणाला,

''मम्मा, बैल म्हणजे काय, हे तुला माहीत आहे का? मैदानाला असलेल्या दाराला मुसंडी मारून कोण आत येतं, माहीत आहे? गाईचा नवरा.''

हा एक मोठाच शोध होता! बैल म्हणजे गाईचा नवरा.

रॉबर्टिनो आपल्या कारशी खेळत राहिला.

**'माय स्टोरी' या इनग्रिड बर्गमनच्या आत्मचरित्रातून.**

**अनुवाद आशा कर्दळे, १९९६**
**मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.**
**प्रेषक : विजया देव**





अनुक्रमणिका

**१. 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे:

**वार्षिक वर्गणी -**

संस्थेला १०० रु.
व्यक्तीला ७५ रु.
परदेशातील व्यक्ती / संस्था २० डॉलर

**२. पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी रोखीने किंवा धनादेश /मनिऑर्डर ने देता येईल. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेशासोबत/ मनिऑर्डर कूपनवर आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी हे अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. पावती दिली जाईल. वर्गणी व तत्संबधी पत्रव्यवहाराचा पत्ता : मृणालिनी शहा, कार्यवाह, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४ एरंडवणे, पुणे- ४११००४

**३. मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु २०/-

**४. प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु.२००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाऊसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतर मीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनकडे उपलब्ध आहे.

**५. जाहिरातीसाठी दर :**

पूर्णपान ७५० रु., अर्धेपान ४०० रु., पाव पान २५०रु, शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ तीन/चार ८०० रु. जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

**मराठी अभ्यास परिषदेची** स्थितिगती आपल्या सर्वांच्या सहकार्यावर अवलंबून आहे. एक करू शकाल?

परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर कार्यवाहांशी संपर्क साधून त्यांना तशी कल्पना द्या.

परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी सहाय्य हवे आहे. ते देऊ शकाल.

आणखी, अर्थातच परिषदेचे क्षितिज विस्तारण्यासाठी नव्यानव्या कल्पना.

**'भाषा आणि जीवन'साठी :**

पुढील स्वरूपाचे लेखन हवे आहे -

परभाषांमधून अनुवाद
ग्रंथपरीक्षणे
'पुनर्भेट', 'वाघिणीचे दूध' अशा सदरांस योग्य मजकुराविषयी सूचना, भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतरत्र वाचनात आलेल्या मजकुराची कात्रणे. जाहिराती आणि वर्गणीदार तर हवेतच.

**संपर्क :**
**मराठी अभ्यास परिषद**
**१ शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे,**
**पुणे ४११००४. (दूरध्वनी ३३३८६९)**



